# प्रस्तावना



प्रस्तुत नाटकाचा विषय सुभद्रा-हरण हा आहे. सुलोचना संगीत मंडळीनें हें नाटक परिश्रम करून बसविलें आणि १९३६ सालीं त्याचे कांहीं प्रयोग सोलापूरच्या मुक्कामाच्या वेळीं झाले. पुढें कांहीं दिवसांनीं ही मंडळी बंद पडली. मुखपृष्ठावरील फोटो सुलोचना संगीत मंडळींतील नट-नटींचा आहे. ह्या मंडळींतील गायन-पटु नट रा. पंडितराव नगरकर यांनीं प्रस्तुत नाटकांतील पदांच्या चाली दिल्या आहेत; त्यांचे व सुलोचना संगीत मंडळीचे आभार मानन प्रस्तावना संपवीत आहें.

मुंबई, नवाकाळ ऑफिस,
शुक्रवार, ता. २३ जुलै
१९४३.

कृष्णाजी प्रभाकर खाडिलकर.

॥ श्री ॥

# संगीत त्रिदंडी संन्यास



## अंक पहिला

### प्रवेश पहिला

[ सूत्रधार व पारिपार्श्वक पूजा करीत आहेत. ]

**पद १**–( राग भूप; ताल एकताल. )

नमिले गुरु-दत्त-पदा । ब्रम्हा विष्णु महेश, टाळाया मानव-क्लेश, एकवटोत ज्योत; प्रकाश सदासर्वदा ॥ धृ० ॥ धरणीवरि धैर्याचा कैवारी, अंतरिक्षि उद्योगा रक्षी, दिवि दिव्य दिवा, दत्तगुरु भक्तांची संपदा ॥ १ ॥

**पद २**–( राग हमीर; ताल त्रिवट. )

फिरत फिरत दत्तगुरु आला, "सावध रे सावध" बोलत गेला ॥ धृ० ॥ मार्गीं निजला दुबळा चेला, दयाळु मार्गे वळला; पांगुळगाडा सुवर्ण झाला, विजेचा वेग तयाला ॥ १ ॥

**सूत्र०**—आपण आतां ठीक मार्गावर आहों; देव काय, निष्ठा काय, मार्ग काय, सर्व एकच—जा तुम्हीं अशा मार्गानें जा—मी ह्या अशा मार्गानें; कोठें तरी वाटेवर—त्या नाहीं ह्या मार्गावर—देव भेटलाच पाहिजे—नाटक सुरू झालें म्हणजे तोच तुमचा देव—आपण आंत जाजों तों नाटक सुरू—

**प० पारि०**—पण तयारी झाली पाहिजे ना ?

**दु० पारि०**—पात्रें सजलीं तर पाहिजेत ? बाईसाहेबांच्या सजावटीला किती वेळ लागतो. माहीत आहे ना ?

**सूत्र०**—त्याची नको काळजी- वाट चालू लागलें–सर्व कांहीं वाटेवर पडलें आहे म्हणून समजा. जा तुम्ही. (पा० जातात) बाईसाहेबांच्या सजावटीला वेळ लागतो म्हणे–आपण जोरानें मार्ग चालू लागावें–वाटेवर नटीची ठेंच ( नटी येते ) किती जलदीनें आलीस, मला तुझी ठेंचच लागत होती—

**नटी०**—मी जलदीनें आलें का तुम्ही जलदीनें जोरानें-धांवतच होता ? मी तुम्हांला आवरणारी आहें म्हणून बरें--नाहीं तर घाईघाईनें कोठें वाटेंतच ठेंच लागून पडाल–असें पावलोपावलीं आपणाला आवरावें लागतें !

**सूत्र०**—पण तूं किती नटली आहेस ही–हिऱ्यामोत्यांच्या राशीवर कां शालूंच्या ढिगावर–कशावर मी ठेंच लागून पडतो आहें, हें प्रथम ओळखायलाच येईना. मग टक लावून पहातो तों आमचीच तूं–अशी खूप सजून वाटेवर उभी–पण तूं आज अशी घाई कशी केलीस ?

**नटी०**—न करून काय करूं ? आपण आपल्या घाईंत नाटक कोणचें करायचें हेंच सांगायला विसरलांत ! अशी सदा घाई ! नेसायला लागलें तरी घाई–दागिने अंगावर घालायला लागलें तरी घाई–हळदीकुंकू लावायला लागलें तरी घाई ! या घाईघाईनें मी मेटाकुटीस आलें हो–कोणचें नाटक कां असेना, हाराभर दागिने दे फेंकून अंगावर; कांहीं कां नाटक असेना, पाट्यावुड्यांनीं चटदिशीं घे फुलें ओतून डोक्यावर–अशा घाईनें का नाटक चांगलें होत असतें ?

**सूत्र०**—न व्हायला काय झालें ? जातीच्या सुन्दरांनीं आपला मार्ग जलदीनें चालू लागावें, मग सजणें, नटणें, रंगणें सर्व कांहीं वाटेवर पडल्यासारखें आपोआप येऊं लागतें.

नटी०—हो, येते आहे आपोआप–नटायला केव्हां येतें ? कित्येक वर्षांची तपश्चर्या करावी लागते आणि रोजच्या रोज एकसारखे हाल सोसावे लागतात. ह्या नटण्याच्या यातना प्रहरानुप्रहर सोसणारी मी खंबीर आहें. उगीच नाहीं मला उशीर लागतो तो! हे अलंकार, हे शालू, हे गजरे, सर्व एकमेकांचे वैरी आहेत आणि कांहीं केल्या नेमलेल्या जागीं निमूटपणें बसून रहात नाहींत; इतकेंच नव्हे, तर भांडतात एकमेकांशीं !

पद ३–( राग देस; ताल त्रिवट )

वेणीवरि झळकत हिरा, "नको म्हणे" फुलांचा गजरा ।
मोत्यांना आवडेना रंगित चेहरा ॥ ध्रु० ॥ चोळी जरतारी शालु
भरजरी, कोंडुनि देह कैद्यापरि, भेटवीना अलंकारा ॥ १ ॥

ह्यांच्या भांडणामुळें नटणें आणि मरणें दोनहि सारखींच वाटतात. ह्या नटण्याचा त्रास आणि त्यांत तुमची घाई, जीव नकोसा होऊन जातो. घाई–घाई ! कोणचें नाटक करायचें सांगायला विसरलांत–घाई, घाई, मूळच नाहीं बाई !

सूत्र०—मीं घाई केली तर तूं जलदी कांहीं न बोलतां केली पाहिजेस मला नांवें ठेवतां कामा नये.

नटी०—कां ? असें कां बरें ?

सूत्र०—तूं माझ्या वाटेवर उभी आहेस, मी तुझ्या वाटेवर उभा नाहीं.–मी माझा मार्ग सरळ चालतों आहें; मी थोडाच वाटेवर पडलों आहें ? ( पडद्यांत–" मी माझा मार्ग सरळ चालतों आहें, मी थोडाच वाटेवर पडलों आहें ?" )

नटी०—कोण हें ? काय बोलत आहे ?

सूत्र०—अग नाटक सुरू ! कोणचें आणि कसलें, काय विचारीत बसली आहेस ? मार्ग चालू लागावें म्हणजे सर्व कांहीं असें वाटेवर पडल्यासारखें दिसूं लागतें.

पद ४–( राग केदार; ताल रूपक )

द्वारकेवर चढाई करून, एकला धनुर्धारी अर्जुन रैवतकीं आला।
सुभद्राहरण–लीला ॥ धृ० ॥ होईल रण घनघोर आतां, यादव
पांडव वीर थोर; युद्ध टाळाया मार्गी नारद उभा ठेला ॥ १ ॥

[ जातात.

[ रैवतक पर्वतावरील गुहा. अर्जुन व नारद प्रवेश करतात. ]

**अर्जुन०**—मी माझा मार्ग सरळ चाललों आहें, मी थोडाच मुनिराज-आपल्या वाटेवर पडलों आहें ? मीं कांहीं केल्या ही छाटी पांघरून येथें बसून रहाणार नाहीं.–नारदमुनि, हा अर्जुन धनुर्धर आहे; संन्याशाची छाटी पांघरायला मी थोडाच नट आहें ?–सुभद्रेला मी माझ्या बाहुबळानें जिंकून ह्या द्वारका नगरींतून पांडवांच्या राजधानींत घेऊन जाईन–द्वारका नगरी-जवळील ह्या रैवतक पर्वतावर चाल करून उभा आहें. धनुष्याच्या नुसत्या टणत्कारानें यादवांना जिंकतो आणि सुभद्रेला घेऊन जातों. वाटेच्या वाटसराला जसा कांहीं तरी उपदेश करायचा तसा मला करूं नका. मी थोडाच आपल्या वाटेवर पडलों आहें ?

**नारद०**—तसें नव्हे पार्था; मी तुझ्या वाटेवर पडलों आहें, असें समज. पण तूं जर माझें ऐकलें नाहींस तर सुभद्रा कांहीं तुला लाभणार नाहीं–बळरामानें सुभद्रेचें लग्न दुर्योधनाशीं ठरविलें आहे; रागावून काय उपयोग?–कर्णाच्या आधिपत्याखालील कौरव-सेना द्वारकेकडे यावयास हस्तिनापुराहून निघाली आहे; उगीच डोळे वटारूं नकोस.–आणि तूं बळजबरीनें सुभद्रेला द्वारकेंतून उचलून आणशील म्हणावें, तर श्रीकृष्णाचे सुदर्शन चक्र द्वारकेचें संरक्षण करीत आहे; फुकट दांत ओंठ खाऊं नकोस ! सुभद्रा

गळ्यांत माळ घातली तर तें सुदर्शन चक्र गप्प बसेल. एरवी हें धनुष्य ह्या लग्नाच्या कामीं निरुपयोगी, अगदीं निरुपयोगी—टाकाऊ, अगदीं टाकाऊ—

पद ५–( राग खमाज; ताल दादरा )

बोजा अवघड, महा जड, धनु विवाहकाजा ॥ धृ० ॥ मधुर लग्न मधुरांत, मृदुल अति बंधनांत; मधु लग्नीं राजा ॥ १ ॥

अरे श्रीकृष्णाच्या मनांत असलें तरी बलरामाला सांगून सवरून बिथर-विण्यास श्रीकृष्ण कसा तयार होईल ? ह्या कामीं श्रीकृष्णाची कांहीं सोय तूं नाहीं पहायची तर कोणी पहायची ? सोय पहात नाहीं तो सोयरा कसला ?

**अर्जुन०**—मी अशी गय करून सोय पाहूं लागलों तर कौरवच याद-वांचे सोयरे लवकर होतील. मुनिराज, कृष्णानें माझी सोय पाहिली पाहिजे, मी नाहीं कृष्णाची सोय पहाणार; असली मैत्री श्रीकृष्णाशीं माझी आहे ! सुदर्शन चक्रानें माझ्या धनुष्याची सोय पाहिली पाहिजे, मी नाहीं त्या चक्राची पर्वा करायचा; असला प्रताप माझ्या धनुष्याचा आहे ! सुभद्रेनें माझ्या मागून आपोआप चालत आलें पाहिजे, मी नाहीं तिच्याकरतां असा तसा तेढा बाका चालावयाचा; असेंच अलोट प्रेम माझें तिच्यावर आहे !

पद ६–( राग शंकरा; ताल त्रिवट )

धनुर्धर हा प्रणयी झाला । समरांगण, तेंवि सदन प्रेमाचें, येत शरण जयाला ॥ धृ० ॥ समजा समरा समरस प्रेमा; एकमेक जणु धाम विरामा; प्रणय-समय जरि वीर्य विसरला, यश नच घालित माला ॥ १ ॥ '

मुनिराज, माझा सरळ मार्ग मला बरा वाटतो. आपली वाकडी तिकडी चाल मला पसंत नाहीं. कारणाकारणानें अर्जुन तीर्थाटण एकटाच करीत

असतांना सुभद्रा दुर्योधनाला देतात असें त्याला समजलें, तो वीर सरळ द्वारकेवर चाल करून गेला, यादवांच्या देखत सुभद्रेचें हरण त्या धीटानें केलें–

**नारद०**—आणि बलराम चवताळला–कृष्णाला कोणत्या युक्तीनें बलरामाची समजूत काढायची हें समजेना–सुभद्रा मुळूमुळू रडूं लागली,–हा दुःखाचा संसार कशाला घरांत आणलास म्हणून धर्मराज अर्जुनाला बोलले–आणि अर्जुनाच्या धिसाड घाईमुळें यादवांचें व पांडवांचें कायमचें बिनसून कौरवांना आनंद झाला–असें अर्जुनाच्या बाईलवेडया वीर वृत्तीनें पांडवांना खडयांत पाडलें! वारे शूर–वारे वीर–वारे धीट–अंधपुत्र असतास तर हा आंधळेपणा तुला शोभला असता! घरांत सदा रडत बसणारी कां बायको तुला पाहिजे आहे? हांसरी सुभद्रा तुला पाहिजे का रडकी पाहिजे?

**अर्जुन०**—मला सुभद्रा पाहिजे, हांसतमुख पाहिजे! ती मिळत नसली आणि कौरवांच्या घरीं जात असली तर कौरवांना रडवीन, यादवांना रडवीन आणि सुभद्रेलाहि–

**नारद०**—रडवीन–सुभद्रेलाहि रडवीन–वारे प्रेम; सुभद्रेलाहि रडवीन–नरडीचा घोट घेणारी ही फार चांगली प्रीति! पार्था, मी इतका वेळ तुझ्या वाटेवर पडलों होतों–हा चाललों मीहि माझ्या मार्गानें–अर्जुन लढणार, बलराम चवताळणार, कृष्ण खिन्न होणार आणि सुभद्रा रडणार! टाळावें म्हणून बघत होतों, पण तूं पडलास हट्टी–वीर–धनुर्धारी–ह्या रैवतक पर्वतावर तुझ्याकरतां दोन दिवस काढावेत असें मनांत आलें–जाऊंदे!–तुला गोड मार्ग नको–द्वेषाला कडू मार्गच आवडावयाचा–जाऊं मी माझ्या मार्गानें सरळ आतां द्वारकेला?–तुला इषारा दिला–नापसंत–नाहींच आवडायाचें–वाटेचा वाटसरू मी–हो माझें काय वेंचतें त्यांत म्हणा–हा द्वेषाचा मार्ग आहे, तुला स्पष्ट स्पष्ट सांगतों.–नाहीं ऐकत–नको ऐकूं–तूं तरी कां ऐकशील–तें धनुष्य आहे ना तुझ्या हातांत–माझ्या वीण्याची पर्वा तूं कां करशील–

सांगायचें माझें काम मीं केलें–असा आतां द्वारकेंत जातों, तुझ्या आधीं द्वारकेंत जातों, तूं पोचायच्या अगोदर पोंचतों आणि तुझ्या हातांतल्या ह्या धनुष्याचें संकट बळरामाला समजावून देतों, मग जातों परत वैकुंठाला; तुझी आणि त्यांची खडाजंगी पहायला मी कशाला राहूं येथें उभा ?

**अर्जुन०**––आग लावून देऊन आपण निघून जाणार–पण मी कसा जाऊं देईन!–मुनिराज, हा अर्जुन द्वेषी नाहीं, प्रेमी आहे.–मला सुभद्रा सुभद्रेकरितां पाहिजे आहे; कौरवांच्या द्वेषाकरितां नव्हे.

पद ७–( राग तिलंग; ताल एक्का )

प्रेम परम मानुनिया, अखिल द्वेष टाळुनिया, वरीन येथ प्रियेला ॥ धृ० ॥ मानतील यादवांत मज प्रेमळ प्रेमळांत । द्वेषाचा पांडवांत नायनाट झाला ॥ १ ॥

असल्या प्रेमाला आशीर्वाद आपण नाहीं द्यायचा तर कोणी द्यायचा ? ( पाय धरतो. )

**नार०**––मीं आशीर्वाद दिलाच आहे; पण तूं माझें कोठें ऐकतो आहेस ?

**अर्जुन०**––मी ऐकत नसलों तर माझ्याकडून करवून घेण्याचा अधिकार आपला आहे.–मी डोक्यांत राख घातली म्हणून आपणहि तसेंच करून कसें भागेल ?

**नार०**––मी जन्मतःच डोक्यांत राख घातली आहे.–तूं ऐकत असलास तर माझ्या डोक्यावरची थोडीशी राख तुझ्या डोक्यावर पडेल–हें पहा अर्जुना, दोनच दिवस–आणखी दोनच दिवस–आज, उद्यां, परवां–आजच्यासकट तीन दिवस येथें बैरागी होऊन जर बसलाच–राख अंगाला खूप चोळ–बैरागी होतोस का संन्यासी होतोस–दोन दिवसांचा संन्यासी–नदींत स्नान केलें, बैरागी झाला राखेंतून मुक्त–ही छाटी अंगावरून काढलीस,

संन्यासी अर्जुन चुटकीसरसा गृहस्थाश्रमी होईल—छाटी दूर कीं सुभद्रा जवळ, असला पर्वकाळ दोनतीन दिवसांत आहे—घेतोस त्रिदंडी संन्यास—क्षणांत संन्यासी—क्षणांत नवरदेव—क्षणांत लग्न—ही छाटी हातांत घेऊन पहा तर कशी मौज होते ती—( छाटी अर्जुनाचे हातांत देतो )

**अर्जुन०**—ही छाटी फार तेजःपुंज आहे.

**नार०**—वीरशिरोमणे, ह्या छाटीच्या तेजापुढें आपल्या तेजाला किंमत नाहीं.—कोणाची ही छाटी माहीत आहे ?—वसिष्ठ महामुनींची ही छाटी आहे.—सर्व दैदीप्यमान वस्तूंचा गर्व हरण करण्याची शक्ति वसिष्ठ महर्षींच्या ह्या छाटींत आहे.

**अर्जुन०**—आपणास ही कशी मिळाली ?

**नार०**—सूर्याला आपल्या तेजाचा आणि विश्वाचें नियमन करणाऱ्या आपल्या अखंड उद्योगाचा गर्व झाला, आश्रमांतच पडून राहणाऱ्या साधुसंतांची निंदा त्यानें आरंभिली; ह्या निंदेबद्दल श्रीविष्णुपुढें जाब द्यावयाला सूर्याला ने म्हणून वशिष्ठ मुनींची मला आज्ञा झाली. आपलें काम सोडून सूर्य कसा येईल अशी मला शंका आली; ही माझी छाटी सूर्याचे अंगावर टाक, सूर्याचें काम ही छाटी करील, मग पदच्युत झालेला सूर्य वीण्याच्या खुंटीला अडकवून वैकुंठाला घेऊन जा, असें म्हणून माझ्या हातांत ही छाटी वशिष्ठ मुनींनीं दिली; मीं तसें केलें. गगनांत छाटी सूर्याचें काम करीत होती, सूर्य माझ्या वीण्याला टांगलेला होता, आणि वैकुंठाला जातांना वाटेंत भूतलाकडे पाहिलें तों रैवतक पर्वतावर पृथ्वीवरील तूं वीरमणि चिंतातुर उभा असलेला मला दिसलास ! गगनांतील व भूमीवरील वीरांची ही दुर्दशा पाहून माझें हृदय दयेनें द्रवलें !

**अर्जुन०**—साधुसंतांचीं अंतःकरणें दयेच्याच साम्राज्यासाठीं आहेत—दया ही साधूंची अर्धांगी व धर्म हा त्यांचा पुत्र.—आपल्या अर्धांगीनें घेरल्यावर आपण पुढें वैकुंठाला गेला नाहीं, वाटेंतच थांबलां, होय ना ?

नार०—सुभद्रेच्या विचारानें तुझी जी अवस्था झाली आहे–हो अगदीं तसेंच,–मी दयेमुळें गोंधळून गेलों. मी दयार्द्र झालों आहें असें पाहून सूर्यानें वीण्याच्या खुंटीवरून पटदिशीं उडी मारून माझे पाय धरले, व साधुसंतांची क्षमा अन्तःकरणपूर्वक मागितली, आणि तूं माझें लक्ष वेधल्यामुळें मीहि माझ्या अख्त्यारांतच घाईघाईनें क्षमा केली. इतक्यांत गगनमणीची वाट चालून छाटी तेथपर्यंत आली; मी छाटी हातांत घेतली, सूर्य आपलें काम पाहूं लागला, आणि पार्था, तुला दोन दिवस ही छाटी उपयोगी पडेल ह्या विचारानें तुझ्या वाटेवर क्षणांत मी असा उभा राहिलों–घे अंगावर ही छाटी, अशी नव्हेरे,–अगदीं अडाणी आहेस–मजपुढें संन्यासी व्हायला लाजतोस–जा त्या झाडाआड, नीट अंगावर घे–(अर्जुन जाऊं लागतो.) आणि हें पहा अर्जुना, ही लाल शालजोडी डोक्याला बांध,–सूर्याची ती तशी सुटका मीं चट्दिशीं तुझ्यापायीं केल्यामुळें प्रसन्न होऊन, तुला देण्याकरितां ही जरतारी लाल शालजोडी स्वतःच्या मस्तकावरून काढून सूर्यानें माझ्यापाशीं दिली. अरुणोदयाचे वेळीं आरक्त प्रकाश जो दिसतो तो ह्याच शालजोडीचा बरें–बांध डोक्याला––

अर्जु०—मी सूर्यासारखा प्रतापी दिसेन ना ह्या शालजोडीनें?

नार०—अगदीं खुलेल संन्यासी.–अरे सुभद्रेची कथा काय, म्हाताऱ्या कोताऱ्याहि बसतील घोळका घालून तुझ्या सभोवतीं कायमच्या–जा जलदीनें सोंग काढ सुंदर संन्याशाचें–मग सांगतो तुला पुढें काय काय करायचें तें–जलदीनें सोंग काढ तोंपर्यंत तुझें हें धनुष्य, हें वाटचालीचें सामान नेऊन ठेवतों गुहेंत. (अर्जुन जातो) आतां आला नीट रस्त्यावर–दंडेलीनें बायको मिळवूं पहात होता–प्रेमाचा मार्ग सोडून द्वेषाच्या मार्गाला लागला होता.–आम्ही साधुसंत द्वेषाला मदत करीत नसतों; आम्ही प्रेमाचे पाठीराखे, द्वेषाचे तडाक्यांतून पार्थाला सोडविल्यावांचून मी कसा राहीन!

पद ८–( राग तिलंग; ताल एका )

द्वेष हा नच चाखियला, प्रेमाचा प्रभु भुकेला ॥ धृ० ॥ गगनीं भुवनीं मधु-वर्षाव, दिव्य तदात्मा तदाकार; मधुरमधुर मधु जगदाधार, जीवन केलें मधु-बला ॥ १ ॥

[ नारद जातो; अर्जुन येतो.

अर्जु०—ही शालजोडी खरेंच फक्कड आहे–अगदीं नव्या नवरदेवासारखा मी दिसत असेन–ह्या वेळीं सुभद्रेनें मला पाहिलें पाहिजे–अरे पण ही छाटी आहेना अंगावर–ह्या भगव्या कैदखान्यांत मला टाकलें खरें, पण आरक्त शालीच्या मार्गानें तुरुंगांतून बाहेर पडण्याचा मार्ग नारदानें दाखविला आहे.–धनुष्याचा नाहीं तर मोहक वस्त्रांचा उपयोग बायको मिळवितांना करून घेतां येईल.

पद ९–( राग मालगुंजी; ताल रूपक )

शाल फुलवी प्रेमा, प्रेमळ रंग लाल; नयन-मनोहर कामसम ॥ धृ० ॥ शोभा गोंडस फार, कामलता जरतार, चंद्रसमा ॥ १ ॥

मी नवरदेव झालों खरा, पण नवरी मुलगी कोठें आहे?–नवऱ्या मुलीसारखी सजून सुभद्रा माझ्या वाटेवर आतां उभी राहिली पाहिजे–माझें धनुष्य नारद घेऊन गेला; मी कांहीं बोललों? मग सुभद्रा नको. धनुष्याचे जागी ह्या चबुतऱ्यावर येथें आणून बसावयाला?–नारद महा साधु खरा पण तितका जाज्वल्य तीव्र साधु नव्हे–मोठी दिरंगाई, आणि मी तर अगदीं उतावळा झालों आहें.–सुभद्रेला येथें आणण्याचा चमत्कार दाखीव नारदा चटदिशी नाहीं तर मी साफ सांगतों नमस्कार करण्याचें मी सोडून देईन आणि धनुष्य हातांत घेईन–रोखठोक ताबडतोब चमत्कार नसेल–देऊं छाटी फेकून–अरे पावलांची चाहूल ऐकूं येऊं लागली–उगीच नारदाला बोललों–हां हां सुभद्रा

येत असेल–सुभद्रा, सुभद्राच–नारद कदाचित् दिशाभूल करील–हो हो बरोबर ऐकूं येऊं लागली–उगीच नारदाला बोललों–हां हां सुभद्राच येत आहे–सुभद्रा, सुभद्राच–नारद कदाचित् दिशाभूल करील–हो हो बरोबर ऐकूं येत आहे–सुभद्राच–माझे कान मला फसविणार नाहींत–सुभद्राच–शंका नको–सुभद्राच–मी सत्पुरुष आहें–सुभद्राच–खोटें नाहीं व्हावयाचें–उतावीळ असलों तरी सत्पुरुष–सुभद्रेच्याच पावलांची ही चाहूल–स्पष्ट पावलें ऐकूं येऊं लागलीं–सुभद्राच—

पद १०–( राग दुर्गा; ताल त्रिवट )

पाऊल हृदयांत ऐकवुनी, व्याकुल तनु मम व्यापी रमणी ॥ धृ० ॥
उमटवित सदा नव नव नादा, नाचवित रुधिर माझी राणी ॥ १ ॥

ये, सुभद्रे, चटकन ये, मन्मथाच्या शरासारखी झपाट्यानें ये–धांवत ये,–अशी लपतछपत पावलें नको टाकूंस–येथें कोणी नाहीं–मी एकटाच आहें–वेलींच्या आड उभी राहून–थबकत थबकत नको येऊंग, जलदी पावलें टाक–आतां इतक्यांत दिसणार खास–बिजलीप्रमाणें एकदम–एकदम माझ्यापुढें चमक–चमक—

[ मेघनाथ व भैरवनाथ प्रवेश करितात.

हे काळेकुट्ट धटिंगण कोण !–नारदा, हीच का सुभद्रा–आणि एकाच्या ऐवजीं दोन–मी उतावीळ झालों तरी असली शिक्षा ह्या पार्थाला काय म्हणून !–पण आतां काय करणार, सांपडलों खरा नारदाच्या कचाट्यांत, पडा मुकाट्यानें छाटीच्या तुरुंगांत. [ छाटी पांघरून चबुतऱ्यावर बसतो.

मेघ०—हेच आमचे गुरुजी, आज नवें सोंग आणलें आहे, पण आम्ही ओळखल्यावांचून कसे राहूं !–गुरुजी, चोरांचीं पावलें चोर ओळखतात बरें–आतां ह्या चेल्यांच्या तावडींतून सुटका नाहीं.

**भैर०**—द्वारकेंत आपली बुवाबाजी काय चाईट चालली होती!—पाया पडणाऱ्या एखाद्या बाईची तरी नथ आपण शिताफीनें लांबवीत होतो—नथ विकून दहावीस मोहरा रोज आम्ही आणून देत होतों—

**मेघ०**—ह्या धंद्यांत आमच्या कडोसरीला एखाद दुसरी मोहर लागे म्हणून आमच्यावर जळफळलां नव्हे गुरुमहाराज? आमच्यावर रुसून गेले. पंधरा दिवस आमच्या हातावर गुंगारा देऊन—अरे, चोराचोरांत अशी बेइमानी! अरे बाबा, अशानें तुझी बुवाबाजी कशी चालणार आणि आमची चेलेबाजी कशी चालणार—

**भैर०**—आमचें न चालायला काय झालें?—आमच्यासारखे पटाईत चेले नाहीं मिळायचे बरें!—पाहिजे त्या दगडाला शेंदूर फासून बुवाबाजीचें दुकान उघडायची करामत आमच्या अंगीं आहे.

**मेघ०**—म्हटलें, नाकाडोळ्यांनीं बरा आहे, फारसा खादाड नाहीं, आमच्यापेक्षां दोन अक्षरें अधिक शिकला आहे, पाण्यांत बसणाऱ्या म्हशीसारखा—

**भैर०**—चिखलांत रुतून प्रहरानुप्रहर बसूं शकतोस—

**मेघ०**—एखाद दुसरीच रोज नवी नवरी, एखाद दुसरीच असली तरी रात्र काढूं शकतो हा ब्रम्हचारी—असे आहेत बाबा तुझ्या अंगीं गुण, म्हणून तुला गुरु केला—

**भैर०**—आणि चेल्यांना लाथाडून पळून आलास?—आतां क्षणभर तुझ्यावरचा आमचा पहारा हलायचा नाहीं.—मेघनाथ, आम्ही इतके बोलतों आहों पण हूं का चूं—गारठल्यासारखा अंग चोरून बसला आहे. मेघनाथ, होऊं द्या तुझी मेघगर्जना—

**मेघ०**—( मोठयानें ) गुरुजी—भामटया—बऱ्या बोलानें बोलूं लाग—भूत आलें आहे ह्याच्या अंगांत—भैरवनाथ, तुझें अकाळविकाळ स्वरूप ह्याला दाखवून कान धरून सूर्याचीं पिल्लें दाखीव.

**भर०**—दावितों सूर्याचीं पिलें, आम्ही भैरवाचीं मुलें;
मिरचीचा धूर आम्हापाशीं, मग ठेवूं उपाशी.

**मेघ०**—"जयदेव जयदेव जय गुरुराया, फटके खायाला पोसली तव काया; आम्ही जिवंत भूतेंखेतें, चालते बोलते चाबुक मिळती आयते"—भैरवनाथ, पकड कान आणि लाव गुरुला बोलायला नाहीं तर रडायला—

**भैर०**—तूं एका बाजूचा पकड, मी दुसऱ्या बाजूचा धरतों—"बोला बोलाहो सत्वरी, नाहींतर कान उपटून, नाक कापून, उरांत शिरेल ही सुरी."

**मेघ०**—"कबूल करा, आमचे पाय धरा, कोणा लुबाडून छाटी आणिली, कोणा लुबाडून शाल बांधिली?"

**भैरव व मेघ०**—(दोघे मिळून) "बोला बोलाहो सत्वरी, वेशीवर टांगूं काळी करणी सारी."

[जवळ जातात; छाटीचे नेत्र लाल होतात; भिऊन मागें सरकतात.]

**भैर०**—गुरुजींच्या छाटीचे नेत्र किती लाल झाले—हातपाय पोळत आहेत—अरे मी जळूं लागलों—मेघा, पाऊस पाड पाऊस—

**मेघ०**—अरे माझेहि हात पेटले—गुरूची निंदा केलीस—शिव्यांची लाखोली वाहिलीस—

**भैर०**—पाण्याच्या ऐवजीं आगीचा वर्षाव होतो आहे—साष्टांग नमस्कार घाल—अरे चमत्कार तेथें नमस्कार—घालूं या लोटांगण—

[नमस्कार घालतात, डोळे शांत होतात. दोन दासी फळाफुलांचीं तबकें घेऊन येतात]

**प० दा०**—योगीराज ह्या येथें आहेत म्हणे—कोणत्या गुहेंत आहेत—ही त्रिमूर्तीची गुहा, तीन मुखांची आहे; ह्या तीनपैकीं कोणत्या गुहेंत आहेत योगीराज?

**दु० दा०**—हीं फळें–हे हार–योगीराजांच्या पुढें ठेवून, ताईसाहेब आतां इक्यांत दर्शनाला येत आहेत म्हणून वर्दी पोंचीव, अशी आज्ञा झाली; म्हणून आम्ही आलों आहों–कोठें आहेत योगीराज ?

**मेघ० व भैर०**—लाल डोळे; पोट भुकेलें; ताट आलें; चेले जेवले ! ( फळें खाऊं लागतात. )

**प० दा०**—हें काय हें–हें सर्व योगीराजांच्यासाठीं आहे—

**दु० दा०**—कोण ही दांडगाई, आम्ही राजवाडयांतल्या दासी आहोंत खरें–असला चटोरपणा–कोठें आहेत योगीराज ?

**मेघ०**—आम्ही चटोर का राजवाडयांतल्या तुम्ही दासी चटोर–योगीराजाच्या ह्या चेल्यांना चटोर म्हणतां ?

**प० दा०**—कोठें आहेत योगीराज ?

**भैर०**—फुटले आहेत का डोळे–हे येथें कोण दगडावर बसलें आहे ?

**दु० दा०**—हे कसले योगीराज ?–हालत नाहींत, डोलत नाहींत, बोलत नाहींत—

**प० दा०**—दगडावर दगड ठेवल्यासारखे–अगदीं निश्चेष्ट–

**मेघ०**—समाधींत आहेत, अगदीं काष्ठ आहेत–हात लावून पाहिलात, नाडीचाहि पत्ता लागणार नाहीं—

**भैर०**—शव आहे नुसतें शव–उगीच नव्हेत योगीराज,–प्रेत आहे नुसतें प्रेत—

**मेघ०**—फार जवळ जाल तर पेटलेल्या चितेंत पडून तुम्ही जळाल–पहा कशी डोळ्यांना आग लागली आहे–दूर व्हा, द्या तें सर्व आम्हापाशीं–भैरवनाथ, तूं हें सर्व ह्या बाजूच्या गुहेंत—

**भैर०**—तूं उचल हें सर्व, तूं हें सर्व या बाजूच्या गुहेंत–

[ सर्व फळेंफुलें हिसकावून तबकांसह दोन बाजूंनीं जाऊं लागतात. ]

**प० दा०**—आतां डोळे शांत होऊं लागले–पण हें काय, तुम्हीच सर्व लांबविलेंत—

**भैर०**—आम्हीच लांबवायचे–चेल्यांचा जन्म आयते खाण्यासाठींच असतो—

**दु० दा०**—पण हे कोण, कुठचे, कांहीं आम्हाला सांगाल कीं नाहीं ?

**मेघ०**—नदीचें मूळ आणि ऋषीचें कुळ–आम्हांला काय ठाऊक असणार?

**प० व दु० दासी**—( मिळून ) योगीराजांचें नांव निदान सांगा—

**भैर०**—ह्याचें नांव, मेघनाथ, घेऊं या ह्यांचें नांव—

**मेघ०**—नवऱ्याचें नांव बायकांनीं घेऊं नये तसें चेल्यांनींहि गुरूच्या पाळण्यांतल्या नांवाचा डांगोरा पिटवितां कामा नये–ह्यांचें टोपण नांव मौननाथ आहे–मौननाथ योगीराजकी जय.

**भैर०**—मौननाथ योगीराजकी जय.

[ भै. व मे. जातात.

**प० दा०**—मेले आडदांड आहेत–फुलासभोंवतींचे काटेच—

**दु० दा०**—काटे कसले, प्राण घेणारे सुरे आहेत–गेले मेले, आतां जिवांत जीव आला.–ताईसाहेब येईतों मौननाथांचें थोडें भजन नाचत करूं या म्हणजे ताईसाहेब आल्यावर त्यांच्याशीं निदान योगीराज बोलूं लागतील—

**प० दा०**—मौनाची कळी फुलवायला गायन नृत्यासारखें दुसरें साधन नाहीं. पण–पण–ह्या पहा, आल्या ताईसाहेब.

**दु० दा०**—हो आल्याच–मौननाथ योगीराज, आतां त्यांच्याशीं तरी बोला–अग फुलांचे हारहि त्यांनीं लांबविले; ताईसाहेब काय म्हणतील ?–चल, त्यांच्यापासून मागून आण या, ह्या आल्या बघ ताईसाहेब, चल लवकर.

[ जातात.

**अर्जु०**—हे वाटमारे चेलेहि गेले, ह्या दासीहि गेल्या—आतां सुभद्रा येणार—द्वारकेच्या राजवाड्यांत दुसऱ्या कोण ताईसाहेब असणार ?—हां ती लांब दिसते आहे, सुभद्राच ती—आतां कोण ह्या आसनावर बसणार—आसन पार डळमळलें—मौन तरी कोण धारण करणार—आतां वाचाळ होतो—ये सुभद्रे, ये—एवढ्या मोठ्यानें म्हणूं—यावें ताईसाहेब—यावें ताईसाहेब—असा हळुवार उच्चार झाला पाहिजे—यावें ताईसाहेब—अशाच ऐटींत उभा राहिलों पाहिजे—छेः इतकें हळू चालायचें नाहीं—दुरून हांक मारल्यासारखें बोललें पाहिजे—असें असें यावें ताईसाहेब—आतां बरोबर साधलें—माझ्या हांकेसरशी आलीच पाहिजे ती—असें असें यावें ताईसाहेब— [ नारद येतो.

**नार०**—अर्जुना, कोण ही घाई !—डोळे आहेत कीं नाहीं ?—नीट पहा—अर्जुना, आतां इतक्यांत सुभद्रा येथें येईल; घाई केलीस, बिघडलें सर्व काम—

**अर्जु०**—त्याची नको काळजी; नारदमुनि, आतां इतक्यांत दोन बिलंदर चोर आपण होऊनच माझे शिष्य झाले, शिव्यांची लाखोली माझ्यावर वाहिली, पण मी हूं का चूं कांहीं न करतां सुभद्रेच्या ध्यानांतून बिलकूल ढळलों नाहीं—कोणी वंदा कोणी निंदा—आमचा प्रेमाचा धंदा—ते कंटाळले पण मी दाद दिली नाहीं—अगदीं जरा देखील रागावलों नाहीं—क्रोध जिंकला मुनिराज आपल्या शिष्यानें—

**नार०**—अरे, क्रोध कोणीहि जिंकतो, पण प्रेम बडबडूं लागलें म्हणजे जिभेला लगाम घालणें दुष्कर होतें.

**अर्जु०**—अहो मुनिराज, चोरांनीं देखील मला मौननाथ म्हटलें—'मौननाथ योगीराजकी जय' असा त्यांनीं माझा जयजयकार केला—परीक्षेला नाहीं उतरलों आपल्या ?—मी आतां पार्थ नव्हे, मौननाथ आहें, मौननाथ.

**नार०**—मौननाथ, आलीच सुभद्रा म्हणून समजा—जीभ दातांत चावून घट्ट धरा,—ही योगाभ्यासाची मुद्रा आहे—चाव जीभ—असा अगदीं गप्प बैस—मी जात नाहीं—गुहेंतून पहारा करतों बरें—सुभद्रेशीं एक अक्षरहि बोलूं नकोस—

**अर्जु०**—येऊं दे सुभद्रा, मुकाच, अगदीं मुकाच—न बोलतां मुनिराज—

**नार०**—असलें कांहीं करायचें नाहीं—उल्लू योगीराज; मौननाथ उल्लू होऊं नका बरें—नाहीं तर चोरांनीं दिलेल्या शिव्या खऱ्या होतील—मौननाथ, जीभ चावा, ओठहि चावा, दांत ओंठ खात समाधिस्थ बसा— [नारद जातो.

**अर्जु०**—(उठून) नारदमुनि गेले बरें झालें—ती आलीच—आलीच सुभद्रा. हिचें पाणिग्रहण क्षणांत करावें, न्यावी हिला येथून पळवून—असा जाऊन धरतो हात, बलराम काय, कृष्ण काय, यादवसेना काय करते पाहूं—दे—(नारद परत येतो)—असा धावून जातों, धरतों सुभद्रेचा हात—वीर आहें मी वीर—

**नारद०**—वारे वीर—अरे उल्लू, सुभद्रेच्या मागोमाग बलराम व कृष्ण येत आहेत—मी त्यांना थोडा वेळ असा आडवा जाऊन आडवतों—कृष्णाची व तुझी गांठ पडेतों सुभद्रेला तूं मौननाथच आहेस असें वाटलें पाहिजे—म्हणजे पहिल्या परीक्षेंतून पार पडशील—न बोलणें आणि प्रेम करणें—एकच आहे—बैस असा नीट आसनावर—खबरदार बोललास तर—मी रागावलों आहें बरें मौननाथ, मी रागावलों आहें—मी रागावलों आहें—

[नारद जातो; सुभद्रा येते.

**सुभ०**—किती शांत हें स्थळ—दादापाशीं किंवा कृष्णापाशीं असलें म्हणजे मन खवळल्यासारखें असतें—सदा दुर्योधनाच्या आणि माझ्या लग्नाच्या गोष्टी—माझ्या कपाळाला आठ्याच पडतात आणि दोघांहि भावांना चवताळून शिव्याशाप द्यावेसे वाटतात—पण येथें—हेच नारदांनीं सांगितलेले योगीराज—अगदीं शांत आहेत—मनांतलें वादळ पार निघून गेलें—अगदीं घरच्यासारखें मला येथें वाटूं लागलें आहे—मी आपल्या घरीं आलें—कोणी वैरी मला आहे असें वाटतच नाहीं—दुर्योधनाची कींव करावीसें वाटतें, कौरवांचें भयच एका क्षणांत नाहींसें झालें आहे.—मी अशी निर्भय कशी एकाएकीं झालें ?

पद ११–( राग यमन; ताल त्रिवट )

प्रेमा, देव पावला या नांवा । एकचि एक आला अनुभावा भय तें सहज मग गेलें गांवा ॥ ध्रृ० ॥ बहु विश्वास हृदयांत उपजला । वाढत जाई क्षणाक्षणाला । फुलवित खुलवित जागा देवा ॥ १ ॥

निर्भय मन झालें म्हणजे साधुसंतांच्या जवळ येऊन आपण पोंचलों म्हणून समजावें.–ह्यांचा हा महिमा येथें पाऊल ठेवण्याबरोबरच माझ्या अनुभवाला आला.–मना, आतां खुशाल जवळ जा आणि सगळें दुःख प्रशांतपणानें बोलून टाक म्हणजे सुखी होशील–जवळ जाऊन करूं या नमस्कार–बलराम व कृष्ण ह्यांची बहीण ही सुभद्रा, दुर्योधनाच्या लग्नाच्या संकटांतून सुटावें आणि मनाजोगा नवरा मिळावा म्हणून योगीराजांच्या चरणांचें वंदन करीत आहे. ( नमस्कार करते. )–हें काय ? मी मन मोकळें करून चटदिशीं सगळें बोलून गेलें आणि हे कांहींच उत्तर देत नाहींत! प्रशस्तीला जर कोठें वाव मिळत असेल तर तो योगीराजांच्या चरणाजवळ–मग मजबरोबर असा अबोला काय म्हणून ?–मनाजोगता नवरा मिळेल, द्यायचा होता असा आशीर्वाद चटदिशीं–आहे मनांत–डोळे उघडले–नाहीं मी मघाशीं म्हटलें घरच्यासारखें वाटतें म्हणून–ओळखीचे भासतात हे डोळे–द्या लवकर आशीर्वाद–मी कांहीं परकी नाहीं–ओळखीचे डोळे–आपणहि परकी नाहीं–द्या लवकर आशीर्वाद–बलराम, कृष्ण, माझी वाट पहात आहेत–रैवतक पर्वतावरील ज्योतिर्लिंगाच्या दर्शनाला आले आहेत–तेथें नारद आलेले पाहून बलराम कृष्णाला चुकवून त्यांचे पाय मीं धरले आणि हाच आशीर्वाद मागितला–त्यांनीं इकडे बोट दाखविलें–आतां आपण जर आशीर्वाद दिला नाहीं तर ते महामुनि आपणांला काय म्हणतील ?–असलें हें मौनव्रत नारदमुनींना आवडेल का ?–आतां मी पुन्हां पाया पडतें–हं मनांत

आलें आहे–डोळयावरून समजतें–ओठावर आलें आहे–डोळयावरून समजतें हो सगळें–आतां माझे कान पवित्र होऊं द्यात–नुसते डोळयांनीं नको–खुलासेवार आशीर्वाद द्या–साधुसंतांच्या नेहमींच्या वहिवाटीप्रमाणें दुटप्पी संदिग्ध नको–मनाजोगता नवरा मिळेल, असें स्वच्छ, स्पष्ट–काय कांहींच बोलत नाहींत–मी स्वच्छ बोलत नाहीं म्हणून म्हणतां ?–मी खुलासेवार बोलत नाहीं म्हणतां ?–मी संदिग्ध बोललें, मनांत कांहीं राखून ठेवलें आहे, असा का संशय ?–मनांत मीं काय राखून ठेविलें आहे ? मनाजोगता म्हणजे कोण ? अशी शंका आली वाटतें.–एवढें जर समजलें नाहीं तर आपण नारदमुनींनीं वाखाणलेले योगीराज कसले ?–मी नाहीं नांव घेऊन सांगायची मनाजोगते कोण ते.–मला कितीहि घाई असली तरी मी नाहीं तिकडचें नांव ह्या पहिल्याच दर्शनाचे वेळीं घ्यायची–नवऱ्याचें नांव घ्यावयाला नायका लाजतात हो—

पद १२–( गझल; ताल दादरा )

पति चमकत तो मूर्तिमंत नांवचि घेतां । नच गुणनिधी मी,
लाजत कांता ॥ धृ० ॥ सगुण कांत भेटतां । सुख बहु,
मनमीलनांत मना लाजवितां ॥ १ ॥

मी नांव घ्यावें, असा हट्ट दिसतो–डोलूं लागले, डोलूं लागले– पण नाहींच मी नांव घ्यायची–असेंच डोलायचें–डोलणें काय बोलणें काय–मनाजोगता नवरा मिळणार–हें डोलणें म्हणजेच आशीर्वाद— [ चंद्रप्रभा येते.

**चंद्र०**—ताईसाहेब, ताईसाहेब, लवकर चला; उभयतां सरकार स्वाऱ्या द्वारकेकडे जायला निघाल्या–आपण ज्योतिर्लिंगाच्या मंदिरापासून इकडे यायला निघाला, इतक्यांत कौरवांकडून एक जासूद आला; पत्रांत लिहिलें होतें, यादवांच्या राजधानींत लग्न न होतां कौरवांच्या राजधानींत लग्न झालें पाहिजे

असा धृतराष्ट्रमहाराजांचा आग्रह आहे, तेव्हां यादवांनीं पत्रदर्शनीं निघून मुहूर्त साधावा. उद्यां सकाळीं गोरजमुहूर्तावर प्रस्थान करायचें, असा झाला दादांचा हुकूम सर्व यादवांना; श्रीकृष्णांनीं वेळ बरी आहेना म्हणून नारद-मुनींना विचारलें; ह्या तीन दिवसांचा पर्वकाळ उत्तम आहे म्हणून त्यांनीं सांगितलें; उद्यां सकाळीं वाट चालत असतांना रैवतक पर्वतावर थोडा वेळ थांबूं व त्यावेळीं योगीराजाचें दर्शन घेऊं असें बलराम म्हणाले; आणि पळत जाऊन सुभद्रेला घेऊन ये म्हणून श्रीकृष्णाची आज्ञा मला झाली.—ताईसाहेब, चला पळत पळत जाऊं—आपल्या लग्नाची घटका भरली—चला जलदीनें—लग्नाची घटका भरली—

**सुभ०**—लग्नाची घटका भरली—हांसत आहेत डोळे—अग चंद्रप्रभे, तूं घाईघाईत योगीराजांना नमस्कार करायला विसरलीस—कर चटदिशीं नमस्कार—( चंद्रप्रभा नमस्कार करते ) लग्नाची घटका भरली—हांसत आहेत डोळे—

**चंद्र०**—चला लवकर ताईसाहेब—लग्नाचे वेळीं नवरी मुलगी जशी उत्सुक असते—

**सुभ०**—तशीं मी उत्सुक आहें—पण कांहीं केल्या लवकर पाय येथून काढायची नाहीं.—अग ज्योतिर्लिंगाच्या देवळांतून ह्या त्रिमुखी गुहेकडे एकटी मी यायला निघालें तेव्हांच माझ्या पायांना समजलें मी लग्नाकरितां प्रयाण करतें आहें—मी येथें येऊन पोहोंचलें आणि वाटलेंच मला लग्नाची घटका भरली म्हणून—बलरामदादा खुशाल गडबड करूं देत—डोलाचा आशीर्वाद मला मिळालाच आहे, कांहीं तरी प्रसाद मिळाल्याशिवाय मी कांहीं येथून हालायची नाहीं—

**चंद्र०**—हे बोलत नाहींत, चालत नाहींत, खातपीत नाहींत—येथें कोठचा प्रसाद ? भलत्याच वेळीं भलताच हट्ट शोभतो का ?

**सुभ०**—अग मघाशीं दोन दासींना फलपुष्पांनीं भरलेलीं तबकें घेऊन पुढें पाठविलें, वाट चुकल्या असतील, इतक्यांत येतील–बघ, बघ–येथें येऊन पोचल्या असतील,–त्या आल्या म्हणजे फुलांचे हार अंगावर घालूं, हे बघ, मधुर फलपुष्पांचे घोस मी माझ्या हातांनीं देईन, जें कांहीं मुखांतून महज खालीं पडेल,–हें बघ, तो प्रसाद मी जमिनीवर नाहीं सांडू द्यायची–तसाच्या तसा झेलून धरीन आणि कृतकृत्य होईन–असें झाल्याशिवाय माझें नाहीं समाधान व्हायचें आणि मी नाहीं येथून हालायची—

**चंद्र०**—असें उष्टें खात बसलां तर येथेंच दिवस अस्तास जाऊन रात्र पडेल—

**सुभ०**—रात्रभर असलें उष्टें मला चाखायला मिळालें, तर तें मी माझें भाग्यच समजेन.

पद १३–( राग बिहाग; ताल एकताल )

हें सुख मज देई सेवा। भजन-सुख घेई, रसना-नाथ मग रमवा।
भजन-मुखीं मधु दिसला, अधरा तेथ ठेवा॥ धृ० ॥ उत्सव-कालीं
रस नटला, जीवन-भोजन सकला; भजन भोग देवा ॥ १ ॥

चंद्रप्रभे, बघ त्या दासी कोठें आहेत त्या–तबकें घेऊन या म्हणावें.

[ दोन दासी येतात.

**चंद्र०**—अग, पूजेचें कोठें आहे ?

**प० दा०**—कसली पूजा आणि कसलें काय ?

**दु० दा०**—मेल्यांनीं फुलेंहि लांबविलीं–फळेंहि लांबविलीं—

**चंद्र०**—कोण मेले चोर तुम्हाला भेटले—

**प० दा०**—कोण म्हणजे ?–ह्यांचेच चेले—

**सुभ०**—ह्यांच्या चेल्यांना चोरबिर म्हणाल तर खबरदार—ह्यांना आडून—लपून—छपून नांवें ठेवलेलें मला नाहीं खपायचें.

**दु० दा०**—चोर म्हणूं नका—दरवडेखोर म्हणतें हो—आम्ही तबकें मौननाथांच्या पुढें ठेवलीं—तें धटिंगण मेले—जबरदस्तीनें त्यांनीं तीं गुहेंत नेलीं—दरवडेखोर नव्हेत तर काय ?

**सुभ०**—ह्यांत कसली जबरदस्ती—तबकें पुढें केलीं; मौननाथांच्याच मालकीचीं झालीं—चेल्यांनीं नाहीं उचलावयाचीं तर कोणी उचलायचीं ?

**प० दा०**—ताईसाहेब आल्यावर चार फुलें तरी पाहिजेतना ? म्हणून गुहेंत मागावयास गेलों—चेले कसले—

**दु० दा०**—बकासुरासारखे सर्व नैवेद्य खात होते—

**प० दा०**—गिधाडें मेलीं—

**सुभ०**—नका, असें वाईटसाईट बोलूं नका—मलाच तुम्ही शिव्या देत आहांत—खबरदार असें कांहीं बोलाल तर.

**दु० दा०**—सालासकट फळें खाऊन टाकलीं ना—

**प० दा०**—सगळया माळा स्वतःच्याच गळयांत घालून बसलेना.

**दु० दा०**—एक फूल तरी द्या म्हणून आम्ही जरा लगट केली—नकोग बाई त्यांचें तें आचकट विचकट बोलणें—पोटांत धडकीच भरते—हात धरून सगळया अंगाला ओरखडलेंच मेल्यांनीं—

**प० दा०**—पी पाय धरू लागले—गुरुजींच्या पुढच्या खारकांप्रमाणें तुम्हांला खाऊन टाकूं म्हणून खिस्सदिशीं अंगावर आले—आम्ही भीत भीत इकडे आलों—

**दु० दा०**—आणि सोन्यारुप्याचीं तीं तबकें घेऊन त्यांनीं पोबारा केला !

**सुभ०**—बरें झालें, ह्यांचा सहवास लाभलेले ते संतुष्ट झाले—सत्संगापासून कांहींच फायदा नाहीं, असें आतां ते नाहीं म्हणायचे.—चंद्रप्रभे,

ह्या फार भ्यालेल्या दिसतात—तूच जा गुहेंत आणि हें बघ, कोठें एखादी फुलाची पाकळी पडली असेल—चेल्यांच्या पायांनीं तुडवलेली कां असेना—एखादी पाकळी मिळाली तरी ती, प्रसाद म्हणून मला आणून दे—( चंद्र. जाऊं लागते.) अगदीं कोनाकोपरा धुण्डाळून बघ—कांहीं तरी प्रसाद घेऊनच—रिक्त हस्तानें येऊं नकोस—( चंद्र. जाते. ) जा ग तुम्ही जा तिच्याबरोबर, काहीं तरी सांपडलेंच पाहिजे—जा ना—

**प० दा०**—ही गुहा म्हणजे चोरांचा अड्डा—खुशाल रागवा—पाहिजे तर शिक्षा करा—चोराला चोरच म्हटलें पाहिजे.

**सुभ०**—माझ्या तैनातीला तुम्ही नको—जा, येथून चालत्या व्हा—मी रागावलें आहे बरें—जा येथून—नको माझ्या तैनातीला तुम्ही—

**दु० दा०**—नको तर नको—आमच्या अंगभर त्यांनीं काढलेले हे ओरखडे—

**प० दा०**—गालावर—हातावर—चोहोंकडे ओरखडे आणि मेल्यांना चोरहि म्हणायचें नाहीं म्हणजे काय—हे ओरखडे उभयतां सरकारांना आम्ही दाखवितो.

**दु० दा०**—ओरखाडलें मेल्यांनीं, जन्माची आठवण राहणार.

[ दोन्ही दासी जातात.

**सुभ०**—महाराज, आपले डोळे असे कावरेबावरे काय म्हणून ? आपल्या शिष्यांना कोणी कांहीं म्हणेल, भीतीच नको. ही सुभद्रा त्या चेल्यांना बोलवून आणील, खायला प्यायला इच्छाभोजन त्यांना घालील, मागतील तितकें धन त्यांना देईल—आपला सहवास अगदीं थोडा वेळ मला झाला, दुर्योधनाकडे जावयास उद्यां सकाळीं निघावें लागणार ह्याची फिकीरच मला वाटत नाहीं.—भ्रमिष्ट झालेलें मन सत्संगानें तेव्हांच ताळयावर येतें—माझें असेंच आतां झालेलें नाहीं का ?—आपला सहवास झाल्यावर चेल्यांची तरी चोरवृत्ति ह्यापुढें टिकेल कशी ?—( चं० येते ) आलीस का चंद्रप्रभे ? आणलास

कां कांहीं प्रसाद—मी प्रसाद घेत असतांना मगाऱ्यासारखें डोलायचें—मला बरें वाटेल—आणलास का प्रसाद ?

**चंद्र०**—पाकळी नाहीं, फळांचीं सालेंहि नाहींत, कांहीं नाहीं; पण प्रसाद आणला आहे—हा घ्या प्रसाद—प्रसादच हा—( धनुष्यबाण सुभद्रेला देते. ) भाताभर बाण आहेत—प्रसाद म्हणून एकच आणला—धनुष्य आणलें सगळेंच्या सगळें—पाकळी बिकळी नाहीं आणली—

**सुभ०**—अगदीं आवडीचा प्रसाद आणलास—माझ्या अंगांत किती हूरूप आला आहे म्हणून सांगूं ? ती मुळुमुळु रडणारी सुभद्रा आतां उरली नाहीं.—आवडीचा—मनाजोगता प्रसाद तूं आणलास, कोणतें बक्षीस तुला देऊं तें सांग—कोणत्या देशाची तुला राणी करूं—बोल, मनींची हौस असेल ती बोल—एका क्षणांत तो देश जिंकून तुझ्या स्वाधीन करते. ही द्वारका नगरी तुला पाहिजे ? यादवांचें मला भय नाहीं उरलें—सांग—पाहिजे द्वारका नगरी ?

**चंद्र०**—मला कांहीं नको—आपण माझ्यावर अशीच कृपादृष्टि ठेवली, म्हणजे सर्व कांहीं मिळालें—पण द्वारका नगरी आपण कोणाच्या जोरावर जिंकणार ?

**सुभ०**—कोणाच्या म्हणजे ह्या धनुष्याच्या—ह्या बाणाच्या—द्वारका नगरीला जिंकण्याइतकें हें धनुष्य वजनदार आहे.—सारथ्याच्या विद्येंत मला प्रवीण केल्यावर धनुर्विद्याहि कृष्णानें मला शिकविली आणि विशेष गुरुकिल्ली जी सांगितली, माहीत आहे कोणती ती ?—कोणतें धनुष्य कोणतें काम देईल, कोणता बाण कोठें उपयोगी पडेल—ह्याचीच ती गुरुकिल्ली मला एकटीला कृष्णानें सांगितली ! केव्हां तरी ह्याहि विद्येची परीक्षा देईन असें म्हणून मीं गुरूला वंदन केलें. आतां संधि आली आहे—चंद्रप्रभे, बघ मी कशी बाण सोडतें ते—सोडूं द्वारकेवर बाण—हा बघ—हा सोडला—हा सोडला बघ बाण—राजधानीच्या निशाणाभोंवतीं गरगर फिरणाऱ्या सुदर्शन चक्राला माझा

बाण भिडला—निशाण पडलें नाहीं पण चक्रांत बाण रुतून चक्र थांबलें—कृष्णाचें सुदर्शनचक्र ह्या सुभद्रेनें थांबविलें ! चल चंद्रप्रभे, गुहेंतले सगळे बाण आणूं या—मला दुर्योधनाकडे घेऊन जातात नव्हे—चमत्कार दाखवितें आज चमत्कार यादवांना—चल सगळे बाण आणूं या—

**चंद्र०**—पण योगीराजांची आज्ञा नको का तसें करायला ?

**सुभ०**—अग दिलें काय घेतलें काय—डोलत आहेत—दिलें म्हणजे घेतलें, घेतलें म्हणजे दिलें—प्रेमाप्रमाणें उल्हासाच्या वेळीं आपलें व दुसऱ्याचें हा भेदच रहात नाहीं.

पद १४–( राग भूप; ताल त्रिवट )

मम हें तव हें मानिना, दिसत नच भेद विमल मनाला ॥ धृ० ॥
मार्ग सरल हा उल्हास गमला, सकल भेद मग सरे लयाला ॥ १ ॥

[ सुभद्रा व चंद्र० गुहेंत जातात.

**अर्जु०**—हें काय झालें हें—कृष्णाचें सुदर्शन चक्र बंद पडलें, माझ्या धनुष्यानें बंद पाडलें—माझा बाण सुदर्शनांत रुतून बसला आहे—वारे वा ! ह्याला म्हणावें नेम मारणें—मत्स्यभेद करणाऱ्या अर्जुनावरहि ताण झाली ! नारदमुनींनीं मला धनुष्यबाण चालवूं दिले नाहीं ? आतां काय झालें ?—सुभद्रेला श्रेय दिलें, मला श्रेय नारदांनीं कां घेऊं दिलें नाहीं ? देवांचा काय, दैवाचा काय, साधुसंतांचा काय, बायकांकडे ओढा—पुरुषांचा पक्षपाती कोणी नाहीं. [ नारद येतो.

**नार०**—अर्जुना आतां येथून पाय काढ—रैवतक पर्वतावर परकी कोण आला आहे ? कोणत्या शत्रूनें बाण सोडला ? सुदर्शन चक्र थांबवून द्वारकेवर कोण हल्ला करणार ? झालीच बघ चौकशी सुरू. आंतल्या गुहेंत तुला लपवून ठेवतों—चोराला सोडून तुला संन्याशाला सुळावर चढवितील—

**अर्जु०**—पण मला कां सुदर्शनावर बाण सोडूं दिला नाहींत?

**नार०**—अरे हें लग्नाचें प्रकरण, युद्धाचें थोडेंच आहे? लग्नाच्या कामांत बायकांनाच पुढेंपुढें करूं दिलें पाहिजे,—चल, ये माझ्या मागोमाग, आतां इतक्यांत येथें व द्वारका नगरींत मोठा गोंधळ माजून राहील, त्या भोंवऱ्यांत तूं सांपडतां कामा नये. लग्नांत बायकांनींच बाण सोडायचे असतात—उगीच सुभद्रेचा हेवादेवा करूं नकोस—चल चटदिशीं—

[ नारद व अर्जुन जातात.

[ सुभ० चंद्र० येतात.

**सुभ०**—कशीग मी दिसते चंद्रप्रभे—पाठीवर हा भाता, हातांत धनुष्यबाण—माझें रूप अगदीं खुलून दिसत असेल नाहीं? हें काय, योगीराज निघून गेले—त्यांनीं मला ह्या धनुर्धारीच्या तेजांत पहायला पाहिजे होतें. मला अशी पाहून ते चकित झाले असते नाहीं?

**चंद्र०**—आपला पराक्रम पाहून—( पडद्यांत दवंडी—"सर्व यादव वीरहो, द्वारका नगरीवर परचक्र आलें आहे, सुदर्शन चक्राला बाण लागला आहे, बळराम महाराज व कृष्णमहाराज राजधानीच्या बंदोबस्ताकरितां तांतडीनें येथून गेले असून शत्रूचा थांग रैवतक पर्वतावर लागतो कीं काय हें सात्यकी पहात आहेत; तर सर्व यादववीरांनीं सात्यकींना येथें मदत करून लगेच द्वारकेकडे झपाट्यानें जावें हो" ) आपला पराक्रम पाहून सर्व यादवांची ही अशी गाळण उडाली आहे—

**सुभ०**—पण मी आतां कशी दिसते, हें पहायला त्यांनीं बसून रहायला नको का होतें?

**चंद्र०**—सर्वच भयाभीत झाले आहेत, योगीराज झाले म्हणून काय झालें—गेले असतील भीतीनें पळून—

**सुभ०**—मी हातांत धनुष्यबाण घेतल्यावर त्यांना ग कसली भीति !—तुला भीति वाटते का—नाहींना—सांग मग तुला मी सुंदर दिसतेना ?

**चंद्र०**—ताईसाहेब, आपल्या पराक्रमाचे परिणाम काय झाले आहेत हें ऐकल्यावरहि आपण आपल्या लावण्याच्याच गर्वात चूर !

**सुभ०**—पराक्रम गाजविला, संपलें; लग्न घटका भरत आली आहे, भरण्यापूर्वी माझ्या लावण्याला भरती आली पाहिजे.—चल, चंद्रप्रभे, तूं आणि मी दोघीजणी माझ्या चार घोड्यांच्या रथांतून द्वारकेकडे जाऊं—द्वारकेंतल्या प्रमुख चांदणी चौकांत गेलों म्हणजे मी दुसरा बाण सोडून सुदर्शनांत रुतून बसलेला पहिला बाण काढून टाकतें—तें चक्र पुन्हां फिरूं लागल्यावर द्वारकेंतील ह्या वेषांतील माझें दर्शन सुदर्शन होतें कीं नाहीं तें नीट पहा, आणि चकित झालेले सर्व नागरिक मजकडे टकमक पहात आहेत अशी मला वर्दी दे.

पद १५—( राग भिमपलास; ताल त्रिवट )

सुखद समागम साधायाला, बल मजला मम रूपलीला; जवळचि
आतां प्रियकर आला ॥ ध्रु० ॥ नयनशरांनीं सजवुनि काया,
नरवर-तनमन जिंकाया, वाढ प्रियाची अडविल बाला ॥ १ ॥

( पहिला अंक समाप्त )

# अंक २ रा.

## प्रवेश पहिला

( स्थळ–सुभद्रेच्या महालापुढील पटांगण मेघ० भैर० प्र० )

**भैर०**—मेघनाथ, राजधानींत चोहोंकडे आपला प्रवेश झाला पाहिजे.

**मेघ०**—आतां आपला प्रवेश पाहिजे तेथें. तुझ्या हातांत तो दंड आहे, माझ्या हातांत हा कमंडलु ! "बनले संन्याशाचे चेले; पाऊल पडे, मार्ग खुले; परि सोडा चोरांचे चाळे, गुरु शिष्यालागीं बोले"—

**भैर०**—सुभद्रादेवीनें आमचा सन्मान केला आणि वेळेवर हे दंडकमंडलू न चोरतां हातीं आले–" नाहीं केली चोरी, पडली अशी चाकरी, दंडकमंडलूंची. "

**मेघ०**—भैरवनाथ, तूं आतां खरेंच चोरी सोडलीस ना ?

**भैर०**—माझ्या हातांत संन्याशाचा दंड आहे–बरा भक्कम सोटा आहे–'तूं चोरी करशील तर मारीन डोकीवर हा असा.'

**मेघ०**—'माझ्या हातांतला कमंडलू चुकवील तो वार असा'—

**भैर०**—( वार करीत ) नाहीं मी चोर.

**मेघ०**—( वार परतवीत ) चोरावर मोर—

**भैर०**—गुरु नसे कोठे—

**मेघ०**—चेले गुरुहून मोठे—

**भैर०**—सोटयाची चढाई—

**मेघ०**—कमंडलुची लढाई—

**भैर०**—गुरु मावळले—

**मेघ०**—चेले माजले— ( चंद्रप्रभा येते )

चंद्र०—तुम्ही अशी मारामारी कशी आरंभिली आहे ? खरेंच चेले माजले—ताईसाहेबांनीं तुम्हांला पक्वान्नें यथेच्छ चारलीं, मागितलें तितकें द्रव्य दिलें—वाईट वर्तन सोडलें म्हणून शपथ वाहिलीत;—पण खाण्यापिण्याचा माज आला वाटतें ? ही आपापसांत मारामारी काय म्हणून ?

मेघ०—काय म्हणून ? आम्ही गप्प बसणारे प्राणी नव्हेत—सुभद्रादेवी-च्या महालांत आमचा बोलबाला झाला तसा ह्या राजधानींत चोंहोकडे झाला पाहिजे.

भैर०—म्हणून आम्ही हा दंड, हा कमंडलू, एका मोठया मठांतून—चोरी न करतां—तसाच हलकेच उचलून आणला—

चंद्र०—उचलून आणलात म्हणजे चोरीच केलीत—

मेघ०—बेवारशी हा माल पडला होता—बेवारशी माल उचलणें म्हणजे चोरी करणें नव्हे—

भैर०—आणि कोणी वारसा सांगूं लागला तर प्रथम लाठी चालवून पहायचें—

मेघ०—त्या मारामारीची मात्रा चालत नाहीं असें वाटलें—घ्या आपला परत, आम्हाला बेवारशी तरी माल कशाला पाहिजे—साव ते साव—“ साव आम्ही चोरांत—मान मिळाला थोरांत ”—

भैर०—“ शूर आम्ही बायकांत—लाठी आमच्या हातांत ”—

मेघ०—आमचा रिघाव सर्व राजवाडयांत कसा होईल,—कांहीं युक्ती सांगतां का ?

चंद्र०—असला धांगडधिंगा सोडून दिलांत आणि तुमच्या योगीराजा-प्रमाणें मौन जर स्वीकारलेंत—बडबडीपेक्षां मौनानें पुष्कळ काम होतें हो—तुम्हांला खरें खोटें समजत नाहीं—बरें वाईट ह्याची माहिती नाहीं, तेव्हां गप्प बसलां तर हातून पाप तरी होणार नाहीं. मौनव्रत घेतलेंत, एकसारखे खोटें बोलण्याची जिभेची संवय थोडीशी तरी मोडेल—पापांतून निघून पुण्या-

कडे जातांना न बोलतां स्वस्थ पडून राहणें ह्याशिवाय दुसरा सुलभ उपाय नाहीं. हें पहा, तुम्ही राजवाड्यांत चोहोंकडे फिरूं लागलां, कोण कुठले म्हणून चौकशी होऊं लागली, तुम्ही वेडेवांकडे बरळूं लागलां तर तें ताई-साहेबांना कमीपणाचें नाहीं का?—गप्प बसायला काय घ्याल असें म्हणण्याची वेळ आणूं नका.

**मेघ०**—आम्ही मौनव्रत घेतलें तर राजधानींतील निदान दासदासी तरी आमच्या पायां पडतील का?

**भैर०**—खायची–प्यायची सोय ताईसाहेबांनीं लावली आहे. पण लोकांनीं पायां पडावें अशी फार इच्छा आहे.—

**मेघ०**—देवहि सांपडेना—

**भैर०**—कोणी पाया पडेना—अशी दुहेरी फसवणूक ह्या दंडकमंडलूंची होतां कामा नये.

**चंद्र०**—नाहीं व्हायची. आतां थोड्या वेळानें रैवतक पर्वतावरील मौन-नाथांची स्वारी येथें राजवाड्यांत यावयाची आहे.

**मेघ०**—ए कमंडलू, ऐकलेंस? आपले दत्तक गुरु येथें येणार आहेत.

**चंद्र०**—मौननाथच ना त्यांचें नांव?

**भैर०**—आम्हाला त्यांचें खरें नांव-गांव माहीत नाहीं—एक बटकेपुरतें आम्ही त्यांना दत्तक घेतलें होतें.

**मेघ०**—आयतें वाटेवर सांपडले—दत्तच ते—झाले गुरु दत्तक.

**भैर०**—दिलें नांव दत्ताला—मौननाथ—ते दत्तक गुरु, आम्ही दत्तक चेले—मूळ संबंध कांहीं नाहीं—

**चंद्र०**—संबंध असो वा नसो. ताईसाहेबांनीं तुमच्यावर मेहेरबानी केली आहे, एवढें निदान खरें आहे. तेव्हां तुम्ही मौननाथ येथें आल्यावर

गुपचुप राहिलें पाहिजे. ताईसाहेबांनीं देखील काल सायंकाळीं स्वतःच्या महालांत पाय ठेवल्यापासून मौनव्रतच घेतलें आहे–सर्व नगरींत काल रात्रभर एकच कल्होळ माजला होता–उभयतां सरकारांनीं रात्रींतून कितीतरी हेलपाटे सुभद्रा देवीच्या महालाकडे घातले–पण हूं का चूं!

**मेघ०**—आम्हाला सांगितलें असतें तर आम्ही ताईसाहेबांना बोलायला लावलें असतें–ह्या दंडांत तो मंत्र भरपूर आहे.

**भैर०**—ह्या कमंडलूंतील पाणी शिंपडून ताईसाहेबांची दांतखिळी मी नाहींशी करतों–तसेंच पाणी पाहिजे–तोंड तेव्हांच उघडतें—

**चंद्र०**—असें बरळाल म्हणून तुम्ही–हे दंडकमंडलू–आतां चुप राहिले पाहिजेत–येरा गबाळांचें काम आतां उरलेलें नाहीं–काल मध्यरात्रीनंतर नारदमुनी आले आणि त्यांनीं कालच्या प्रकारासंबंधाचें आपलें दिव्य ज्ञान उभयतां सरकारांना असें सांगितलें–

**मेघ०**—आमच्या संबंधानें खऱ्याखुऱ्या बातम्या सांगितल्या काय?

**भैर०**—आमचें बिंग नारदमुनींनीं उघडें केलें काय?

**चंद्र०**—तुम्हाला कोण विचारतो?–मौननाथांनीं येथें येऊन सुभद्रादेवीला मौनव्रत सोडण्याची आज्ञा केल्याशिवाय सुदर्शन चक्राला लागलेल्या बाणाची खरी हकीकत समजायची नाहीं, असें नारदमुनींनीं सांगितलें. सुभद्रादेवींशिवाय दुसऱ्या कोणाला खरी हकीकत माहीत नाहीं—

**मेघ०**—ह्या दंडकमंडलूंनाहि खरी हकीकत माहीत नाहीं–अथपासून इतिपर्यंत हें खोटें, खरें कसें माहीत असणार—

**भैर०**—मौननाथांची छाटी मात्र जरा खरी आहे. ती खरें बोलेल–त्या आमच्या लफंग्या गुरूला—

**चंद्र०**—भलतें बरळूं लागलां—अशानें—

**मेघ०**—लफंग्या बिफंग्या आम्ही कोणाला म्हणणार नाहीं—स्वीकारलें मौनव्रत—बसली दांतखिळी—

**चंद्र०**—अशीच आपली मुस्कटदाबी करून घ्या—ती पहा तुमच्या गुरुजींची स्वारी नारद मुनींसह ताईसाहेबांच्या महालाकडे वळली आहे—न बोलतां हे दंडकमंडलू त्यांच्यापुढें नाचवत नाचवत चाला म्हणजे संन्याशाबरोबर दंडकमंडलूंना कोठेंच मज्जाव होणार नाहीं—या असे मुकाट्यानें माझ्या मागोमाग—तुमच्या गुरुजींच्या आसपास तुम्हाला नेऊन मीं सोडतें. (जातात.)

---

## प्रवेश दुसरा

(स्थळ—सुभद्रेचा महाल—आसनावर अर्जुन बसला आहे.)

**अर्जु०**—असा मी आसनावर किती वेळ बसून राहूं? आसन घातल्यानें मन शांत होतें म्हणतात, पण मी तर क्षुब्ध झालों आहें—कां मी संतापून जाणार नाहीं? सुभद्रेच्या ह्या महालांत आल्यावर सुभद्रा माझ्याजवळ नसावी म्हणजे काय? मी येथें यावयाच्या आधीं सुभद्रा ह्या आसनावर बसलेली असावयास पाहिजे होती—नारदा हें तूं सगळें उलटें करतो आहेस; मी बाण सुदर्शनावर मारावयाचा, तो सुभद्रेनें सोडला—म्हटलें जाऊं द्या!—मला सुभद्रेच्या महालांत आणलें, मनाला वाटलें होतें मी आल्यावर सुभद्रा आसनावरून हळूंहळूं लाजत मजकडे चोरून पहात उभी राहूं लागेल, मी तिचा हात चटदिशीं धरीन, बाण सोडून दमली असशील तेव्हां उभी रहाण्याचे श्रम कशाला, असें म्हणत मी माझ्या शेजारीं बसवीन आणि आर्जवें करीन—

पद १६–( राग धनाश्री; ताल त्रिवट. )

रमवितो बाला कोमला, चरण चुरुनि मग नाजुकाला खुलवित मी श्रृंगाराला ॥ धृ० ॥ चटपट पाया उचलुनि दमली, लटपटतांचि सावरुनि धरली, सुखकर विलास हा झाला ॥ १ ॥

नको सुभद्रे अशी लाजून दूर होऊं नकोस–येथें दुसरें कोण आहे ? किती लाजणार–किती वेळ दूर उभी रहाणार–अशी फार वेळ उभी राहिलीस तर–बसायचें नाहीं असाच हट्ट असेल तर–माझ्या अंगावर सर्व भार टाक–हं अशीच रेलत रेलत अंगावर भार टाकून–मी सांवरून धरतों–मी दाखवूं कसें रेलायचें तें–नाहीं, माझ्या धनुष्यबाणांहून मी कांहीं–असा रेललों तर तुला–पहा जड न वाटतां–फुलासारखा रेलतों–रेलूं असा ? ( नारद येतो. अर्जुन त्याच्या अंगावर रेलतो ) हें काय नारदमुनि, सुभद्रेच्या महालांत तुम्ही ! माझी अशी विटंबना कां आरंभली आहांत ?

**नार०**—अरे उतावीळ नवरा गुडघ्याला बाशिंग–अशी तुझी स्थिति झाली आहे. अरे तुझीं बाशिंगें–मी आहें–नीट मस्तकावर धारण कर, मग सुभद्रेचें दर्शन–बैस नीट आसनावर–आणि हें पहा, रामकृष्ण आतां येथें येतील. तूं कांहीं बोलायचें नाहीं–बलराम फार चवताळला आहे–तूं हूं का चूं करायचें नाहीं–श्रीकृष्णाशीं देखील बोलायचें नाहीं–चालायचें नाहीं–डोलायचें नाहीं–खबरदार डोललास तर–जड सृष्टींतल्या पाषाणासारखा गप्प बैस–डोललास तर पृथ्वीकंप होईल आणि श्रीविष्णूचें सुदर्शनचक्र पुन्हां बंद पडेल.

**अर्जु०**—मग रैवतक पर्वतावर मला पढविलेंत इतकें इतकें बोल म्हणून, तें केव्हां बोलायचें ?

**नार०**—मी तशी विनंति करीन त्यावेळीं–अगोदर बोलूं नकोस–

मागाहून नको–मध्येंच नको–बैस चटदिशीं–ते पहा रामकृष्ण आले–नीट सावरून बैस, पहात काय उभा राहिला आहेस–मी आणतों त्यांना बेताबेतानें–आस्ते–आस्ते–तोंपर्यंत छाटीबिटी नीट पांघरून बैस– ( नारद जातो )

**अर्जु०**—नारदा, लग्न केव्हां होईल तेव्हां होवो–सध्यां तर आपल्या शिक्षेचे कोरडे मला सोसावे लागत आहेत.

**पद १७**–( राग जैजैवंती; ताल एकताल. )

ह्या लग्नीं मला ही कैद; बांधुनिया हालचाल, कोंडिला मौननाथ नायक प्रणयांतला ॥ धृ० ॥ प्रेम तें फुले जगांत, परि जाळीपोळी आंत; मग चलनवलन घेई पाठचि नटनांतला ॥ १ ॥

( अर्जुन बसतो. बलराम, कृष्ण व नारद येतात. )

**बल०**—नारदमुनि, हेच का ते मौननाथ ? ह्यांचें अनुकरण करून सुभद्रेनें–मौनव्रत–मौनव्रत–ह्यांचेंच अनुकरण करून—

**नार०**—होय बलरामा, ह्यांनीं सांगितल्यावरून का ह्यांचें अनुकरण करून ताईनीं मौनव्रत घेतलें–तें कसें काय मला माहीत नाहीं. पण काल रात्रीं सुभद्रेला बोलायला लावतांना सर्व गुरुजन, सर्व मांत्रिक, सर्व देवऋषि–मी देखील–सर्वांनीं हात टेकल्यावर सकाळीं मी यांजकडे गेलों आणि सुभद्रेला ह्यांनीं सांगितल्यावर सुभद्रा बोलूं लागेल असा बंदोबस्त करून ह्यांना अगदीं थोडया वेळापुरतें–पाव घटकेपुरतें–कसें बसें आणलें आहेत—

**कृष्ण०**—फार योगी दिसतात–दादा, मोठे योगी आहेत–

**बल०**—कृष्णा मी योगीबिगी कोणी जाणत नाहीं; सुभद्रा बोलली पाहिजे तरच योगी–सुभद्रा जर ह्यापुढें बोलली नाहीं तर माझी गदा योगी आहे–मांत्रिक आहे–देवऋषि आहे–ह्या गदेच्या महामंत्रापुढें सर्व योगी लटपटतात. भूतें, पिशाच्चें, राक्षस सर्वांना दे माय धरणी ठाय होऊन जातें–

सुभद्रेला बोलायला लावण्याचा हा शेवटचाच उपाय! नाहीं साधलें तर मी आहें—सुभद्रा आहे—आणि माझी गदा आहे—पाहून घेईल गदा दुर्योधनाच्या लग्नाला कशीं विघ्नें येतात ती—

**कृष्ण०**—पण दादा हे मोठे योगी दिसतात—फार शांत—फार मोठे अधिकारी पुरुष योगविद्येंतले—फार लायक—मोठे सत्पुरुष, दादा, नमस्कार करूं या.

**नार०**—योगिराज मौननाथांना श्रीकृष्ण नमस्कार करीत आहेत—किती शांत—हूं का चूं—हालत नाहींत, बोलत नाहींत, डोलत नाहींत, असलें आसन, श्रीकृष्णा, आम्हांसारख्या मुनींनाहि साधत नाहीं. बलरामा तूं कर आतां नमस्कार—बलरामा, तुमच्यासारख्या विभूति जवळ आल्यावर वैकुंठांतील काय—महामुनींचीहि समाधि आपोआप उतरते—पण हे पाषाणाप्रमाणें—दगड—प्रत्यक्ष दगड—हूं का चूं—बोलायचें नाहीं, चालायचें नाहीं—डोलायचें नाहीं—

**कृष्ण०**—दादा, मला माझ्या योगविद्येचा फार अभिमान—योगीश्वर कृष्ण म्हणून नारदमुनि मला केव्हां केव्हां संबोधितात. नारदालाहि योगाभ्यासाच्या दोन गोष्टी सांगाव्यात असा अहंकार वर डोकें करूं लागतो; पण दादा, हें प्रकरण फार जड दिसतें.

**नार०**—बिलकुल हलायचें नाहीं—फार जड—फार जड—बिलकुल डोलायचें नाहीं—फार जड—बिलकुल डोलायचें नाहीं—फार जड—दादा, आतां आपला नमस्कार—

**बल०**—यादवांचा पुढारी गदाधारी हा बलराम मौननाथांच्या चरणीं प्रणाम करीत आहे—सुभद्रेनें कालपासून मौनव्रत घेतलें आहे तें तिनें सोडावें आणि आम्हाशीं मोकळ्या मनानें बोलून—दुर्योधनाशीं तिच्या ठरलेल्या विवाहाला अडथळा झाला असला तरी दुर्योधनाशींच तिचा विवाह—असे कसे हे डोळे एकदम लाल झाले—कृष्णा, पहा—पहा—आग लागली आहेसें वाटतें योगीराजांच्या देहाला—छाटी पेटते आहे—

**कृष्ण०**—दादा, आपण दुर्योधनाचें नांव काढायला आणि ह्या डोळ्यांना—खरोखरच आग लागली आहे—पेटले आहेत—दुर्योधनाचें नांव आम्ही सोडून देतों—सुभद्रा नुसती बोलूं लागली म्हणजे आम्हाला पुरे,—दादा पहा आग विझाली—डोळे शांत झाले.

**बल०**—डोळे शांत झाले—पण मी शांत झालों नाहीं. दुर्योधनाचें नांव मी हट्टाहट्टानें घेणार. दुर्योधनाला सुभद्रा देऊन टाकावयाची हें मीं ठरविलें आहे—कृष्णा, होऊं देत डोळे लाल रागानें—दुर्योधनाशीं लग्न मीं ठरविलें आहे तें माझ्या गदेच्या जोरावर—कोणाला कितीहि राग येऊं दे, मी लग्न ठरविलें आहे—माझ्या गदेपुढें कोणाचें कांहीं चालणार नाहीं. होऊं देत डोळे लाल—कृष्णा, सुभद्रेला येथें घेऊन ये—जा ताबडतोब सुभद्रेला घेऊन ये—( कृष्ण जातो ) नारदमुनि आपल्या सांगण्यावरून श्री मौननाथांना येथें आणलें आहे—आपला आग्रह नसता तर एव्हांना या गदेनेंच सुभद्रेला बोलायला लावलें असतें. मौननाथ महाराज, सुभद्रा येतांच तिनें आम्हाशीं खुलासेवार बोललें पाहिजे. अशी आज्ञा तिला झाली पाहिजे आणि हे डोळे शांत पडले पाहिजेत,—कोणाचेहि डोळे असोत—माझ्या गदेपुढें हे डोळे शांत पडले पाहिजेत—

**नार०**—बलरामा, ह्या छाटीची तपश्चर्या फार मोठी आहे. सूर्यचंद्र ह्या छाटीपुढें कांहींच नाहींत—इतकेंच नव्हे तर ही छाटी ज्यावेळीं वैकुंठांत लकाकते त्यावेळीं श्रीविष्णूच्या हातांतील शंखचक्रगदा ह्या तीनहि आयुधांचें तेज फिकें पडतें आणि त्रिभुवनाला संतोष व सुख देणारें पद्म तेवढें खुलूं लागतें. ह्या छाटीपुढें बलरामा, तुझा क्रोध व्यर्थ आहे—तूं जसजसा रागावशील तसतशी अधिक लाल ही छाटी होईल आणि त्रिभुवनाला भस्म करून सोडणारें सामर्थ्य येथें प्रकट होईल.

पद १८—( राग भिमपलास; ताल त्रिवट. )

प्रलयाग्नि हा पहा छाटींत दाटला, वडवानल जैसा सलिलांत थांबला ॥ धृ० ॥ देवकार्या न ये, अकालीं डवचितां, ज्वाला उलट जाळतील भूमि आतां ॥ १ ॥

बलरामा, ह्या छाटीशीं तणतणणें तुला योग्य नाहीं. सुभद्रेला मौनव्रत सोडण्यास सांगण्याचें ह्यांनीं मला अभिवचन दिलें आहे. सुभद्रा आली म्हणजे क्षणांत येथील काम आटोपेल. मग ही छाटी पालखींत घालून रैवतक पर्वतावर पोंचवून देऊं—बलरामा, तूं पाहूंच नकोस ह्या छाटीकडे!—कृष्ण पाहील—सुभद्रा नमस्कार करील—छाटी शांत होईल. तूं पाहूं नकोस—अरे तुझे डोळे लाल होऊं लागले, छाटीचेहि डोळे लाल होऊं लागले—नको पाहूंस—भलताच प्रसंग गुदरेल—

बल०—आतां आणखी भलताच प्रसंग तो कोणता गुदरायचा आहे? ह्या बळरामाच्या नांवाची कुचेष्टा सर्व द्वारका नगरींत होत आहे—सुदर्शनांत रुतलेला परचक्राचा बाण सुभद्रेनें सहज लीलेनें काढून टाकला; असल्या धनुर्धारी बहिणीला गदाधारी नवरा शोभत नाहीं; असें सर्व दुनिया मोठमोठयानें बरळूं लागली आहे—नारदमुनि, गांवच्या लोकांच्या तोंडाला कोणी लागावें म्हणा, पण घरच्या बायकांनांहि कालपासून असाच उच्छेद मांडला आहे.—ह्या गदाधाऱ्यावर नेहमीं संतुष्ट असणारी आपली शिष्यीण—ती माझी लाडकी रेवती, वन्संना धनुर्धारीच नवरा पाहिजे, गदाधारी नको, असें माझ्या तोंडावर म्हणाली. सटवे पुन्हां असें बोललीस तर गदाच डोकीवर घालीन असा चवताळलों—ह्याहून तिचे डोळे अधिक लाल झाले होते—पण माझ्या गदेपुढें गप्प बसली. रेवतीच्या डोळ्यांचें मला थोडेसें भय वाटतें पण तुमच्या ह्या छाटीच्या डोळयांचें भय मला मुळींच वाटत नाहीं. दुर्योधनाशीं लग्न ठरलेलें आहे—पाहिजे तितके डोळे लाल होऊं देत—दुर्योधनाशीं लग्न ठरलें आहे तेव्हां सुभद्रेनें मौनव्रत आतांच्या आतां सोडलें पाहिजे—एवढयाच करितां ह्या छाटीला पालखींतून मिरवत येथें आणली आहे.—होऊं देत डोळे लाल—आतांचें आमचें काम जर झालें नाहीं—मी आहें, माझी गदा आहे; छाटीचे लाल डोळे आहेत तर माझेहि लाल डोळे आहेत—पाहून घेऊं—ह्या

बलरामाची गदा कृष्णाच्या सुदर्शनचक्रासारखी लेचीपेची नाहीं—लागला बाण, पडलें तें सूक्ष्मयंत्र बंद, लागले द्वारकेंतले यादव सैरावैरा धांवायला ! घाबरलेल्या कृष्णाला ह्या गदेनें पुन्हां शुद्धीवर आणलें आहे मुनिराज! मौननाथ योगीराज, सुभद्रा आतां येथें आली म्हणजे ती बोलूं लागली पाहिजे—बजावून ठेवतों—नाहीं बोलूं लागली तर वेताळाच्याहि अंगचा समंध काढण्याचे महामंत्र ह्या गदेला माहीत आहेत—पहा मुनिराज—

**नार०**—सुभद्रा आली.

**बल०**—कसे डोळे मीं शांत केले पहा.

**नार०**—सुभद्रा आली—सुभद्रा आली—

**बल०**—नरमले छाटीचे डोळे माझ्यापुढें—

**नार०**—हो—हो सुभद्रा आली, छाटी शांत झाली—सुभद्रा आली—( कृष्ण व दंडकमंडलू घेतलेली सुभद्रा धनुष्यासह येते ).

**बल०**—सुभद्रे, हें हातांत काय आहे ? दंडकमंडलू—काय म्हणून हातांत दंडकमंडलू ? कृष्णा, जोगीण होण्याची ही तयारी दिसते—

**कृष्ण०**—तसें नव्हे दादा—ह्यांची ही शिष्यीण—मौननाथांचें अनुकरण करून मौनव्रत घेतलें—गुरूचीं प्रसादचिन्हें—हे दंडकमंडलू आले—उगीच रागावूं नका दादा—पोर आहे—खेळांतला हा संन्यास—हें धनुष्य—हे बाण—तशांतलेच हे दंडकमंडलू !—नारदमुनि, ताईला हे दंडकमंडलू फार शोभतात नाहीं ?

**नार०**—ही अपूर्व शोभा आहे—बलरामा, वैकुंठांत एकदां श्रीविष्णुपुढें सर्व साध्य ऋषि व देव सभेस बसले असतांना बायकांनीं संन्यास घ्यावा किंवा कसें असा प्रश्न निघाला. अतोनात वाद झाला. मीं तडजोड काढली, बायकांनीं एका हातांत धनुष्य, एका हातांत बाण, एका हातांत दंड व एका हातांत कमंडलू असला त्रिदंडी संन्यास घ्यावा—नवरा मिळाला कीं गृहिणी,

लग्न नाहीं झालें कीं संन्यासी—बलरामा, सुभद्रेकडे पाहिलें म्हणजे माझ्या मनाजोगता त्रिदंडी संन्यास मूर्तिमंत अवतरला आहेसें वाटतें. द्वारकानगरी म्हणजे दुसरें वैकुंठच—

**बल०**—पण मला द्वारका नगरीची वस्ती त्रिदंडी संन्याशांची करावयाची नाहीं. सुभद्रे, ते दंडकमंडलू खालीं ठेव आणि मौननाथांना नमस्कार—कां ऐकत नाहींस—का वेडी झाली आहेस ?—सुदर्शन चक्राला थांबविणारे ते धनुष्यबाण आणि तसाच चवताळलों तर माझ्या किंवा तुझ्या संन्यासाची तयारी म्हणून हे दंडकमंडलू—कशी शेफारली आहे पहा—बोलत नाहीं, चालत नाहीं, हालत नाहीं, डोलत नाहीं,—जशी कांहीं दगडी पुतळीच—काय ऐकूं येतें कीं नाहीं मी काय बोलतों तें—सुभद्रे, तुझ्या कमंडलूचेंच ह्या गदेनें प्रथम चूर्ण करतो—( गदा उगारतो )

**नार०**—हें काय बलरामा, वैकुंठांतल्या ह्या ब्रम्हचाऱ्याकडे पहा आणि संन्यासी वृत्तीच्या चिन्हांचा असा उपमर्द करूं नकोस.

**कृष्ण०**—दादा, तुम्ही पाहिजे तर डोक्यावर गदा मारली तर चालेल—तुमची आमची बहीण आहे—सोशील तोहि घाव—पण ताईनें अल्लडपणाच्या तोऱ्यांत धारण केलेले हे नवे अलंकार—दादा आपली गदा बायकांच्या अलंकारांना चूर्ण करणारी नाहीं—चतुर्भुजा देवीसारखी आपली ताई ह्यावेळीं शोभते आहे, नाहीं ?

पद १९–( राग कापी; ताल रूपक. )

भूमिवरि अवतरली ही प्रतापी शक्ति जाणा, दंड—कमंडलु संयमन
धनुष्य—बाणा ॥ धृ० ॥ गदेवरि ताण धनुष्य—बाण; गदा पृथ्वी,
बाण गगनींचा राणा; जयजय या देवीची प्रेरणा ॥ १ ॥

मौननाथ, ही चतुर्भुजा देवीसारखी नाहीं शोभत ? ( अर्जुन डोलतो ) दोन अधिक हात लावले—लावले—फुटले पाहिजेत—चार हातांत चार आयुधें ! ( अर्जुन डोलतो )

**नार०**—डोल होऊं लागला—बलरामा आतां घाई केली पाहिजे—डोल होऊं लागला—सुभद्रेला नमस्कार करायला सांगा.

**बल०**—मी सांगतों आहे मघांपासून—माझें कोण ऐकतें आहे.

**कृष्ण०**—ताई, चटदिशीं नमस्कार कर, म्हणजे मनाजोगता नवरा मिळेल.

**बल०**—दुर्योधनच नवरा मागितला पाहिजे—दुर्योधनच नवरा मिळाला पाहिजे—कर नमस्कार. ( सुभ० नमस्कार करते ).

**कृष्ण०**—मनाजोगता नवरा मिळेल बरें ताई—

**बल०**—दुर्योधनच नवरा ताई मागत आहे—दुर्योधनच मिळेल असा द्यावा आशीर्वाद—द्या मी सांगतो तसा आशीर्वाद—द्या मी सांगतो तसा आशीर्वाद—

**अर्जु०**—मौनव्रत सोड आणि गुरुजनांशीं मन मोकळें करून बोल, तुझें कल्याण होईल—

**बल०**—आणि दुर्योधनच नवरा मिळेल—द्या असा आशीर्वाद, दुर्योधनच नवरा— ( नार० अर्जुनाला उठवितो ).

**नार०**—चला आता तांतडीनें रैवतक पर्वताकडे.

**बल०**—आशीर्वाद—दुर्योधनच—आशीर्वाद—मी इतके दांतओट खातो आहें—द्या मी सांगतों तसा आशीर्वाद.

**नार०**—श्रीकृष्णा, योगीराजांची पालखी तयार आहे ना ?

**कृष्ण०**—सर्व तयारी आहे—या योगीराज असे—असे.

( कृष्ण, नारद व अर्जुन जातात.

**बल०**—द्या मुकाट्यानें मी म्हणतो तसा आशीर्वाद, दुर्योधनच नवरा मिळाला पाहिजे—सुभद्रे, तूं आतां बोलूं लागलीस ना—योगीराजांनीं नाहीं दिला तसा आशीर्वाद—नाहीं तर नाहीं. माझें थोडेंच नडणारें आहे असा आशीर्वाद न दिल्यानें—सुभद्रे, मी देतो तुला तसा आशीर्वाद—तूं माग मजपाशीं तसा आशीर्वाद—तूं माग—तूं माग—काय पुटपुटते आहेस ? स्पष्ट बोल, पुटपुटणें नको—ओठांतल्या ओठांत काय पुटपुटते आहेस ?

सुभ०—मी माझ्या पतिराजांच्या नामाचा जप करीत आहें. तो जप आपणास आवडणार नाहीं. मौनव्रत घेतलें—आपण मोडविलेंत तें व्रत—आपणास रुचणार नाहीं—भलते कान जप ऐकतील म्हणून कोणास न ऐकूं येईल अशा बेतानें—जप चालला आहे माझा पतिनामाचा—

बल०—माझे कान—भलते कान—तुझ्या पतीचें नांव मला आवडणार नाहीं.—सुभद्रे, तुझ्या वयनीनें माझे पाय धरिले म्हणून तुझ्या मौन व्रताची इतकी उस्तवारी केली—आतां तरी नीट शुद्धीवर ये—आणि मी सांगितला तसा आशीर्वाद मजपाशीं माग. सुभद्रे, एक प्रहराची अवधि तुला देतो. तेवढ्यांत शुद्धीवर आलीस तर बरें. नाहीं तर—नाहींतर सर्रास गदेचा मंत्र जपला जाईल. [ जातो.

सुभ०—सर्रास गदेचा मंत्र! धनुर्धारी पतीच्या नामापुढें गदेचा मंत्र काय चालणार आहे?

पद २०—( राग जीवनपुरी; ताल एक्का. )

मनन सतत चरण पतिचे; पावन जीवा ॥ धृ० ॥ मम मनीं संदेह नसावा, सुखमय पति-धाम-सेवा; उपदेशितो नाम-जप सावध भावा ॥ १ ॥

पतीच्या नांवांत जितकी जादू भरलेली असते तितकी कोणत्याहि शब्दांत आणि उच्चारांत नसते—काल रैवतक पर्वतावर मनांतल्या मनांत कितीदां मीं तें नांव घेतलें—त्यांच्या जीवनाचा संचार अंगांत झाला—सर्व इंद्रियें त्या मंत्राच्या सुरांत गढून गेलीं! प्रत्येकाच्या पूर्णपणें सुरेल होण्याच्या हौसेमुळें एकाच गाण्यांत सर्व देह विलीन झाला; आणि मीं केव्हां धनुष्य हातीं घेतलें, केव्हां बाण सोडला व सुदर्शनाचा भेद केव्हां झाला, मला समजलें देखील नाहीं. पतिनामाच्या जपानें अशी समाधी लागते, सुखाच्या शिखरावर

जीव जाऊन बसतो, एका भरारीसरशीं गगनांत आपलें घरटें जीवाच्या पंखांनीं कायमचें गांठलें जातें ! दादा, आपण आपली गदा पृथ्वीवर जोरानें मारून केवढाहि भूकंप झाला तरी पांडवांच्या दिव्य महालांत यादवांच्या पिंजऱ्यांतून रहावयास गेलेला पक्षी कसा परत येईल ?

पद २१–( राग जंगला; ताल धुमाळी. )

जीव रमतां, स्थाइक होतां, चंचलता अचला आतां ॥ धृ० ॥
पतिगृहीं आनंदासि निगडित तनमन कोंडुनिया, स्थावर मी कांता ॥ १ ॥

---

## प्रवेश तिसरा.

(स्थळ—सुभद्रेच्या महालांतील एक भाग. भैर० व मेघ० प्रवेश करतात.)

**मेघ०**—भैरवनाथ, चंद्रप्रभा येथें सांपडेल म्हणून म्हटलेंस, पण येथें ती कोठें दिसत नाहीं—

**भैर०**—चंद्रप्रभा नाहीं दिसली तर ताईसाहेबांचे दर्शन होईलच. मग आम्ही या नव्या यातनेंतून सुटूं.

**मेघ०**—नकोरे बाबा हें राजवाड्यांतलें रहाणें—सगळ्या दासी आमच्या अंगावर ओरखडे काढायला टपल्या आहेत. राजवाड्यांतल्या दासी नखें काढीत नाहींत कारे ?

**भैर०**—रैवतक पर्वतावरील त्या दोन दासींना तूं ओळखलेंस ? उट्टें काढायला सगळ्या टपल्या आहेत.

**मेघ०**—मौननाथांचे आम्ही चेले—सगळ्या पायां पडल्या, पण पाय ओरखडायला एखादी चुकली असेल तर शपथ—माझ्या पायांतून रक्ताचे [illegible] होतें

भैर०—माझ्या पायाची तर चाळणच झाली–रैवतक पर्वतावर केव्हां पळून जाऊं असें मला झालें आहे. (चंद्र० येते) ही आली चंद्रप्रभा. घेउ या चंद्रप्रभेचाच निरोप—

मेघ०—ताईसाहेबांचा निरोप घेतला काय–हिचा निरोप घेतला काय एकच–पण पहा बरें हिच्या हाताचीं नखें वाढलेलीं आहेत काय–पहा नीट—

भैर०—ह्या राजवाड्यांत सर्व शूर्पनखा भरलेल्या आहेत–पाया पडणाऱ्या दासींच्या नखांनीं फाडफाडून आमच्या पायांच्या चिंधड्या झाल्या आहेत.

चंद्र०—पुरली ना आपली पायां पडून घेण्याची हौस–

मेघ०—ह्या जन्मीं आम्ही कांहीं कोणाला पायां पडूं देणार नाही निदान बायकांचें पाया पडणें टाळूंच–बायकांच्या नखाला धार फार- रक्तबंबाळ झाले पाय.

चंद्र०—मला नखें नाहींत हो–भिऊं नका–मी पडूं पायां–

भैर०—नको, नखें नसलीं तरी नको–नखें नसलीं तरी दांत आहेत ना- चावाल–नेम नाहीं–आम्ही ताक देखील फुंकूनच पिणार–एवढ्याचसाठ आलों, आतां राजवाड्यांत कांहीं आमची धडगत नाहीं–तेव्हां ताबडतोब रैवतक पर्वतावर परत जाणार–ताईसाहेबांची कांहीं असेल तर पोहोंचवूं.

मेघ०—म्हटलें आतां हें चिठ्ठीचपाटीचें द आमच्याजवळ तसें कांहीं साधन असलें तर ह

चंद्र०—पत्रबित्र पोचवायचें असलें तर तुम्ही नका तसल्या भानगडींत पडूं–

भैर०—मग मौननाथांचे डोळे रागाव दुसरी युक्ति सांगा. मौननाथ मोठे सिद्ध पु भरलेली आहे–

**मेघ०**—सुभद्रादेवींच्या पुण्याईनें आतां आम्हीं सावाऱ्या जन्माला आलों आहों–पण मागील जन्माची–चोराच्या जन्माची आठवण बुझलेली नाहीं–मोठी सिद्धि असलेले आम्ही कित्येक गुरुजी पाहिलेले आहेत–बायकांच्या हातांतील कांकणांपुढें सगळे मऊ पडतात असा आमचा अनुभव आहे–मौननाथांच्या जवळ जायला कांहीं बायकी साधन जवळ असलें पाहिजे–कांहीं बायकी साधन—

**चंद्र०**—मग भराना हातांत कांकणें–मौननाथ आपोआप मऊ पडतील–हां, हां, तुम्ही राधेचें व्रत घ्या. तुम्हाला कोणाची भीति उरणार नाहीं–येथें द्वारकेंत एखाद्या गवळ्याला श्रीकृष्णाकडे जायला मज्जाव झाला म्हणजे तो राधेचें व्रत घेतो, मग तेव्हांच त्याला श्रीकृष्णाचें दर्शन घडतें.

पद २२–( राग जिल्हामांड; ताल रूपक. )

वेष राधेचा साजरा, उतरे थोरांचा तोरा ॥ धृ० ॥ अर्पण करि तनमनधन; उपासनेचा मार्ग हा पतितास बरा ॥ १ ॥

ह्या सोंगाची बतावणी करा–मग मौननाथांची भीति नाहीं.

[illegible]घ०—कायरे काळभैरवा–आम्ही जरा गोरे असतों तर कांहीं तरी [illegible] ह्या काळ्याकुट्ट चेहऱ्यांनीं कसें व्हायचें.

[illegible]ध वेष नाहीं साधायचा, ताईसाहेबांच्या हातांतील नाहीतर [illegible] कांकणें द्या–पायांतले पैंजण द्या–प्रसाद कांहीं–पाहिजेना.

[illegible]णि मोकळ्या पायांनीं कसें जावयाचें गुरुजींच्या [illegible]विलीं हातांतील कांकणें–आणि अनिवार रागा-[illegible]च.

[illegible]ाग भेरव; ताल धुमाळी. )

[illegible] पैंजण, चेले भूषण गुरुला ॥ धृ० ॥

[illegible]ऱ गुरु मतिमंद; वाढेल आमचें दोंद, पैंजणें

[illegible]

**मेघ०**—ही कांकणांची व पैंजणांची कळा आम्हाला शिकवा म्हणजे मौननाथावर चाल करून आम्ही जातों रैवतक पर्वतावर—

**चंद्र०**—या असे माझ्या मागून म्हणजे लागेल तितकीं कांकणें आणि चांगले चांगले पैंजण मी देतें तुम्हाला ( जातात ).

---

## प्रवेश चवथा

( स्थळ—बलरामाचा गदामहाल—बलराम व रेवती प्र. क. )

**बल०**—ह्याच गदामहालांत मी सुभद्रेला दोन उपदेशाच्या गोष्टी सांगून पहाणार आणि तिच्या लग्नाचा सोक्षमोक्ष एकदांचा करून टाकणार—ह्या—प्रकरणाचा निकाल ह्याच गदामहालांत झाला पाहिजे.

**रेव०**—पण वत्संच्या महालाकडे आपण गेलों तर त्यांत काय बिघडलें ? त्यांचें चित्त ठिकाणावर नाहीं—आपण तेथें गेलों तर त्यांच्या मनाला तितकें हलकें वाटेल,—त्यांच्या जिवाला बरें वाटत नाहीं—

**बल०**—आणि बरें वाटतें आहे कोणाच्या जिवाला ? खरें म्हटलें असतां माझ्याच समाचाराला सर्वांनीं यावयास पाहिजे होतें—पण तुम्ही बायका अशा—रेवती, तूंहि सुभद्रेचा कड घेशील असें वाटलें नव्हतें—सुभद्रेनें मौनव्रत घेतलें—चालल्या सगळ्याजणीं सुभद्रेच्या समाचाराला, जरा गदा उगारून मी सुभद्रेशीं बोललों—जमला घोळका सगळयाजणींचा सुभद्रेच्या सभोंवती, जसें कांहीं तिला सुळावर चढवायला काढली आहे. दुर्योधनाशीं लग्न म्हटलें, सुभद्रेचा एक डोळा ही रेवती पुसते तर दुसरा डोळा रुक्मिणी पुसते—आम्हा पुरुषांची किंमत नाहीं ठेवलीत तुम्ही सुभद्रेपुढें ! ह्या गदामहालांतच जें कांहीं बोलायचें तें मी बोलून घेणार—

रेव०—निदान एका जागीं स्वस्थ तरी बसायचें होतें—अशा येरझाऱ्या घालीत फिरत राहिल्यानें चवताळल्यासारखें दिसतें. आतां भाऊजी येतील, घरसं येतील—उगीच त्यांच्या अंगावर वस्सदिशी नाहीं जायचें—

बल०—तूं मला आतां कांहीं शिकवूं नकोस—ह्या महालांतील सर्व गदांचा संचार माझ्या अंगांत झाला आहे—सुभद्रेच्या महालांत गेलों असतों तर एकटी माझ्या हातांतलीच गदा तेथें बोलली असती—येथें ह्या आमच्या पूर्वजांच्या गदा—ह्या मल्लयुद्धांत व गदायुद्धांत जिंकलेल्या वीरांच्या गदा—सर्व सर्व बोलूं लागल्या आहेत—आणि मला सांगत आहेत बलरामा, रेवतीला मध्यें बोलूं देऊं नकोस—श्रीकृष्णाचें ऐकूं नकोस—आणि सुभद्रेला तर—येऊं दे सुभद्रा—गदांची आज्ञा अशी आहे—सर्व गदा दुर्योधनाच्या बाजूच्या आहेत—येऊं दे सुभद्रा, तिला अखेरचें सांगतो— [ कृष्ण येतो.

रेव०—भाऊजींशीं जरा बेताबेतानें बोलायचें होतें—अगदीं टाकून—दुसऱ्याचें मन दुखावेल असें बोलूं नये—

बल०—तूं बोल कृष्णाशीं—मी सुभद्रेची हजेरी घेणार. कृष्णाचीं आर्जवें करून मला काय करायचें आहे ? बघ कसा चोरासारखा येतो आहे—मांजराच्या पावलानें येतो आहे-दहीलोण्यावर नजर ठेवून गवळणींच्या घरांत शिरण्याची मांजरी हातोटी ह्याच्या पायांनीं द्वारकेंतहि सोडली नाहीं. कृष्णा, दणदण पाऊल टाकीत ये. येथें दह्याची हंडीहि नाहीं व लोण्याचा गोळाहि नाहीं—वज्राहून अधिक घनघोर गदांनीं हा महाल भरलेला आहे.

कृष्ण०—म्हणूनच पाऊल जपून टाकीत आहें. दादा, महालाचें हें रुद्र स्वरूप पाहून मौनव्रत सोडलें असलें तरी ताईच्या तोंडून एक शब्द तरी निघेल किंवा नाहीं –

बल०—निघतांच कामा नये—थरथर कांपणाऱ्या शरीरानेंच सुभद्रेनें माझ्या म्हणण्याला रुकार दिला पाहिजे-ही आली सुभद्रा—अशी गदा उगारून युद्धाच्या पावित्र्यांत मी उभा राहिल्यावर——

( दोन दासी दंडकमंडलू घेऊन पुढें चालत आहेत, मागाहून सुभद्रा व हातांत धनुष्यबाण घेऊन चंद्रप्रभा प्रवेश करितात. सुभद्रा सर्व गदांना नमस्कार करून प्रदक्षिणा घालते, व सिंहासनावर धनुष्यबाण-दंडकमंडलू ठेवून पाया पडल्यावर हात जोडून बलरामापुढें उभी राहते )

**कृष्ण०**—पाहिलेंत दादा, आपली ताई कशी गरीब आणि धर्मशील आहे ती-एका गदेलाहि नमस्कार करण्याचें व प्रदक्षिणा घालण्याचें तिनें सोडलें नाहीं.-इतका सूक्ष्म धर्म आम्हालाहि सुचत नाहीं दादा. वहिनी, तुम्ही खरेंखरें सांगा-ह्या महालांत येण्याबरोबर सर्व गदांना दादांनीं नमस्कार केला होता ?

**रेव०**—मी नमस्कार करायला विसरलें-इकडूनहि विसरणें झालें-आपणहि नमस्कार केला नाहीं-पण वत्सांनीं-धर्म धर्म म्हणून जर कोठें असेल तर तो वत्संमध्यें आजकाल जागा आहे हो !

**बल०**—तुम्ही माझा तेजोभंग असा पावलोपावलीं करीत असता-चांगलें नव्हे-सुभद्रे, संपलें तुझें पायां पडणें-तुझ्या लग्नाची विल्हेवाट कायमची करण्याकरितां ही गदा मीं हातांत घेतली आहे-माझ्या आज्ञेप्रमाणें तुला वागलें पाहिजे-बोल, सुभद्रे बोल, एकदांचा सोक्षमोक्ष होऊन जाऊं दे.

**सुभ०**—दादा, आतां माझ्या लग्नाचा सोक्षमोक्ष व्हावयाचा काय उरला आहे ?-माझें लग्न माझ्यापुरतें झालेलें आहे-रामकृष्णांची ही बहीण वधु-पक्षाच्या दृष्टीनें निदान अविवाहित उरलेली नाहीं-सुभद्रेचें सासर पांडवांचें कुल होणार किंवा कसें ह्याचा विचार यादवांनीं करण्याचें आतां प्रयोजन नाहीं-ते नरवीर धनुर्धर पांडव-कुलांत मला घेतील किंवा बाहेर टाकतील हें दादा, आतां त्यांच्या मर्जीचें आहे-राम-कृष्णांच्या मर्जीचें नाहीं, ह्या रेवती वहिनींच्या मर्जीचें नाहीं, किंवा या सुभद्रेच्याहि मर्जीचें नाहीं !

मौनव्रताचे वेळीं एकसारखें पतिनाम म्हणून मीं त्यांच्या नांवाचा जप केला, आणि मौनव्रत सोडावयास लावल्यावर त्याच पतिनामाचें गीत मीं उघडपणें सर्वांदेखत गायिलें, सर्व यादवांना आतां कळून चुकलें आहे, ही सुभद्रा पांडवांची आहे व त्यामुळें यादवकुलाला एकप्रकारें मुकलेली आहे–यादवांच्या घरांतून कुंतीची ही सून आपल्या स्वतःच्या घरीं जावयास ह्या क्षणीं निघाली असून माहेरच्या सर्व गुरुजनांना व गदास्वरूपी देवतांना प्रयाणसमयींचा नमस्कार करीत आहे–दादा, आपल्या गदेचा व आपला आशीर्वाद मी यादवांची कन्या व पंडूची सून या नात्यानें मागत आहें.

पद २४–( राग पिलु; ताल केरवा. )

जनक–कुला बहु नमितां, पतिकुलांत रमते दुहिता ॥ धृ० ॥
गुरुजनांत उपदेश ऐकिला, वंशाचि पतिचरणांत सांठला; स्वकुला कुल जडवी वनिता ॥ १ ॥

दादा, मी सासरीं जायला निघालें आहें, आपला आशीर्वाद मला पाहिजे.

**बल०**—लग्न व्हायच्या अगोदर सासर माहेर करणाऱ्या मुलीच्या मस्तकावर गदेचा आशीर्वाद मिळत असतो.

**सुभ०**—तोहि आशीर्वाद मस्तकावर धारण करण्यास मी कचरणार नाहीं–आपल्या गदेनें माझें जीवित ह्या क्षणीं समाप्त झालें तर तेंहि माझें वाईट भाग्य नव्हे.

**बल०**—तुला दुर्दैवाचे डोहाळे आठवूं लागले आहेत—

**सुभ०**—दुर्दैव आणि सुदैव–मी माझ्या दैवाची परीक्षा पहावयाला उभी राहिलें आहें–दादा, मघाशीं आपण एक प्रहराची अवधि दिलीत तेव्हांच मीं निश्चय केला–अन्न आणि पाणी दोनहि त्या क्षणापासून मीं सोडून दिलीं आहेत–मीं मनानें वरलेल्या पतीच्या चरणाचें तीर्थ पतीच्या आनंदासह मला प्रत्यक्ष मिळेतों मी अन्नपाण्याला शिवणार नाहीं–अशी माझी प्रतिज्ञा आहे—

**बल०**—फार चांगली प्रतिज्ञा—अर्जुन तरी पति म्हणून भेटो किंवा मरण येवो—तोंपर्यंत अन्नपाणी वर्ज्य—उत्तम आहे ही प्रतिज्ञा—सुभद्रे, तुझ्या या प्रतिज्ञेनें माझी काळजी दूर झाली आहे—तुझ्या कपाळावर गदा मारणार होतों—स्त्री—हत्येचें पातक लागेल ह्याची मला चिंता नव्हती—आततायी—मग पुरुष असो वा स्त्री असो—परशुरामानें आईला देखील मारली—मीं बहिणीला मारायला मागेंपुढें पाहिलें नसतें. तुला मारून जें साधलें नसतें तें तुझ्या प्रतिज्ञेनें माझें साधलें आहे. तुला मारली असती तर दुर्योधन सुभद्रेला मुकला असता—आतां एकदोन दिवस जाऊं देत—रैवतक पर्वतापर्यंत पायीं चालून जाशील—सरडाची धांव कुंपणापर्यंत——

**सुभ०**——तीर्थाटणांत जेथें ते असतील तेथपर्यंत अन्नपाण्यावांचून मी पायीं चालत जाईन.

**बल०**——रैवतक पर्वतावरच अन्नपाण्यावांचून तडफडत प्राण जाऊं लागले—दादा पाणी, कृष्णा अन्नाचा घांस—दीन गाईसारखा हंबरडा फोडशील—पाहूं कोण तुला अन्नपाणी देतों तें. दुर्योधनाचा धांवा केल्याशिवाय पाण्याचा थेंब किंवा अन्नाचें शीत दृष्टीस पडणार नाहीं. पहारा ठेवतों तुझ्या अन्नपाण्यावर—दुर्योधनाचा धांवा करण्याच्या मार्गाला आयती लागलीस—

**सुभ०**—दादा, मी मरण आनंदानें पत्करीन पण पतीच्या नांवाशिवाय दुसऱ्याचा धांवा, रामकृष्णांचाहि धांवा, ही सुभद्रा करणार नाहीं.—दादा, मी आततायी नाहीं—दुराग्रही नाहीं—किंवा माझ्या संकटाचा भार आपल्यावर पडावा म्हणूनहि मीं अन्नपाणी सोडलेलें नाहीं—माझ्या दैवाचा कौल मीं परमेश्वराला लावला आहे—परमेश्वराची इच्छा ताबडतोब समजून घेण्यास ह्याशिवाय दुसरा मार्ग नाहीं. मला त्याचे मनांत मारायचें असलें तर तो कसकसा मारतो हें पाहीन—त्याच्या मर्जीचें कौतुक करीन, परमेश्वरी लीलेच्या निरीक्षणांत निमग्न होऊन मी आनंदांतच मरेन! मला मारण्याची

त्याची इच्छा नसल्यास–( बलराम गदा खाली करतो ) कसा देव तारतो हें समजूं लागलें म्हणजे निरीक्षणाच्या आनंदाला भरती येते. दादा, आपली उगारलेली गदा आपल्या हातांनींच खालीं आणली–असला अनुभव येऊं लागला म्हणजे निश्चय बळकटच होतो आणि परमेश्वराला धन्यवाद द्यावेसे वाटतात.

पद २५–( राग कलिंगडा; ताल त्रिवट. )

देव राबला पदापदाला, बहु बिकट मार्ग सुलभ झाला ॥ धृ० ॥
वज्रासम कठिण गदा,–घांव भरडिला, नाजुक दळिला,–घालीं पायघडिला ॥ १ ॥

दादा, मी ह्या धनुष्यावर बाण चढवून सुदर्शनचक्र बंद पाडलें, यादवांच्या पराक्रमाचा अपमान झालासें वाटून आपण संतापलां; मी कमंडलु हातीं घेतला, तुम्हाला माझी चीड येऊन तुमचा क्रोध पेटला; पण अन्नपाणी सर्व सोडून सर्व जीवित परमेश्वराचे चरणीं अर्पण करण्याचा पण माझ्या स्वयंवराचेवेळीं मीं लावलेला पाहून माझा मार्ग मोकळा करून ह्या सर्व गदांच्या कोंडमाऱ्यांतून बाहेर पडतांना आपण निदान अडथळा मला करीत नाहीं, हा काय लहानसान चमत्कार आहे ?

**कृष्ण०**—दादा, ताई चमत्कार करून दाखवूं लागली–असाच कांहीं काळ लोटला म्हणजे लोक ताईला देवीचा अवतार समजूं लागतील.

**बल०**—ही देवी आणि देवीपुढचा भुत्या तूं–दिवटी घेऊन नाच तिच्यापुढें—

**सुभ०**—कापराची दिवटी हातांत घेऊन परमेश्वर सर्वांच्यापुढें चालत असतो दादा—

**बल०**—पिसाळलेल्या कुत्र्याप्रमाणें प्रत्येक शब्दावर सुभद्रे, भुंकत राहूं नको–असल्या भुंकण्यापेक्षां उपाशीं राहतांना मौनव्रत कां ठेवीत नाहींस ?

**कृष्ण०**—दादा, ताई धनुर्विद्येप्रमाणें बोलण्यांतहि पटाईत झाली आहे. ही बोलूं लागली म्हणजे मला वाटतें हिचें अर्जुनाशींच लग्न लागलें तर माझ्या मागची एक ब्याद तरी नाहींशी होईल. खांडववनांत पार्थाचें सारथ्य करून जंगलांत नवी वस्ती पांडवांकरितां वसवीत असतांना अर्जुनाच्या कानी-कपाळीं हें बरें हें वाईट अशी एकसारखी वटवट करावी लागली आणि त्या वीराची समजूत घालतां घालतां मला जीव नकोसा झाला. ऐनवेळीं भलती-कडेच झुकण्याची खोड ह्या नराला फार–दादा, ही घोरपड जर त्या नराच्या गळ्यांत पडली तर रोजच्या रोज त्याला चांगलें पढवील–आणि माझ्या रथाच्या घोडयाबरोबर रथांतील नराचीहि लगाम खेंचण्याचा माझा बराच त्रास वांचेल.

**बल०**—तुझा त्रास वांचेल पण कौरवांचा आणि यादवांचा शरीरसंबंध होऊन माझ्या गदेनें जरासंधाला मारावें हा माझा व्यूह ढासळून पडेल–कृष्णा, कंसाला तूं कुस्ती खेळून मारलेंस तसें जरासंधाला मारून मी तुझ्यावर ताण करावी ह्या आशेवर आजपर्यंतचे दिवस मीं काढले–ही सुभद्रा माझ्या पैलवानीवर आतां खरखरलेले निखारे ठेवीत आहे खरखरलेले निखारे—

**सुभ०**—सोन्याची द्वारका स्थापिलीत तेव्हांच यादवांची पैलवानी मर्दुमकी संपली–रणांगणावर मर्दुमकी ह्यापुढें गाजवावयाची नाहीं अशीच प्रतिज्ञा द्वारकेंत पाऊल टाकतांना श्रीकृष्णानें केली आहे. दादा, आपल्या गदेच्या प्रहारावर किंवा कृष्णाच्या सुदर्शनाच्या फेकीवर मदार ठेवून रणांग-णांत लढणारा योद्धा मला पति म्हणून मुळींच नको–असला हुंडा तुम्ही मला देऊं नका–उपदेशाच्या चार गोष्टींच्या गीतांनीं माझ्या सासरचें समाधान झालें पाहिजे आणि जिंकूं तर स्वतःच्या बाहुबलानें जिंकूं, दुसऱ्याच्या उसन्या

घेतलेल्या पराक्रमापेक्षां मरण बरें, अशा करारी आग्रहाचें सासर, दादा, मला पाहिजे आहे. ह्या गदा, तें सुदर्शन किंवा द्वारकेचें सोनें, कोणाच्याहि मदतीची अपेक्षा ह्यावेळीं सुभद्रेनें धरलेली नाहीं—माझें सासरहि तसेंच पाहिजे-कौरव तसे नाहींत-कर्णाच्या धनुष्यावर ते अवलंबून—बलरामाच्या गदेवर त्यांची भिस्त—आणि सूतपुत्राचें घर भरण्याकरितां द्वारकेंतील सोन्याच्या हुंड्यावर त्यांचा डोळा—पांडवांचें सासर मिळण्याचें भाग्य जर माझ्या कपाळीं नसेल— उपासमारीनें मरण आलेलें अधिक श्रेयस्कर—

**बल०**—जीभ फार वळवळूं लागली—कृष्णा, दे हांकलून ह्या पिसाळलेल्या जिभेला रैवतक पर्वतावर—तेथें अन्नपाण्यावांचून ही जीभ हालेनाशी झाली-मग पुढचा विचार—पिसाळलेली आहे—कोणी बरोबर जाऊं नका— जाऊं दे पायीं एकटी धिंडवडा—चंद्रप्रभे, दंडकमंडलू धनुष्यबाण तूं आपल्या हातांत ठेव. आणि लांबून लांबून हिच्या मागून चाल—दुसरें कोणी नको बरोबर—लांबून चाल—कोठें आहेत दंडकमंडलू.

**सुभ०**—ह्या येथें यादवांच्या सिंहासनावर सुदर्शनाला थांबविणारें धनुष्य बसलें आहे—

**बल०**—आमच्या सिंहासनाचा अपमान?

**सुभ०**—अपमान कसला? सर्व जगाचा व्यवहार सुरळीत चालविण्याकरितां सतत फिरणारें सुदर्शनचक्र व त्याबरोबरच द्वारकेची सर्व रहाटणी ज्या धनुष्यानें कांहीं काळ जागच्याजागीं थांबविली तें धनुष्य यादवांच्या सिंहासनाला स्पर्श करण्यास कसें नालायक? द्वारकेंतील सोन्याच्या राशींची पर्वा सिंहासनानें करूं नये म्हणून शिकविणाऱ्या दंडकमंडलूंची स्थापना मंत्र्यांच्या आसनावर मीं केली, कोणतें वावगें झालें? उचलतें मी—उगीच धडपड नको—उचलतें मी—( उचलते ) चंद्रप्रभे हीं माझीं निशाणें घेऊन तूं रैवतक पर्वताकडे पुढें जा—मी एकटी येतें मागाहून—दादा, उपासाची शिधोरी पदरीं बांधून सासरी जावयास निघालेली आपली बहीण यादवांच्या देवतांना व गुरुजनांना नमस्कार करीत आहे.

**बल०**—आतां नमस्कार चमत्कार सर्व कांहीं रैवतक पर्वतावर—कोणी हिच्या दृष्टीसच पडूं नका—घालूं दे, काय धिंगाणा घालायचा तो एकटीला घालूं दे—चला येथून सर्वजण—सुभद्रे, रैवतक पर्वतावर दुर्योधनाचा धांवा करूं लागलीस—मग आम्ही येऊं—तोंपर्यंत आमचें दर्शन तुला नको.

[ सुभद्रेशिवाय सर्व जातात ]

**सुभ०**—हालचाल करणाऱ्या देवता निघून गेल्या—पण ह्या अचल देवता-यादवकुळाचें संरक्षण करणाऱ्या माता ह्या गदा—जागच्याजागीं आहेत—ह्या मला आशीर्वाद दिल्यावांचून कशा राहतील? गदांनो, शरीरबलाच्या देवतांनो, मानवी शरीरांतील पार्थिव भागावर तुमची सत्ता आहे. तुम्ही आतां मला मारा किंवा तारा—उपवासांत त्यांची गांठ पडेतों तुम्ही मला ताजीतवानी ठेवा--आणि गांठ पडायचीच नाहीं असें जर नशीब असेल तर माझें मरण माझ्या डोळ्यांनीं सुखांत मी पहात असतांना चुकून कौरवांच्या बाजूचें होण्याइतकें माझ्या शरीराला लटपटूं देऊं नका. लटपटणें म्हणजेच अपकीर्ति—ती तुम्ही टाळा—यादवांची कीर्ति वाढविण्याकरतां हें मागणें मी मागत आहें, यादव व पांडव दोनहि कुळांचा महिमा शिखरास पोंचावा म्हणून मीं आपणास नमस्कार केला आहे, आणि माझा शेवट कसाहि व्हावयाचा असला तरी, मातांनों, माझी शरीर डळमळण्याची अपकीर्ति होऊं देऊं नका—एवढीच आपणास माझी शेवटची विनंति आहे! सर्व माता प्रसन्न दिसताहेत—बलरामाच्या हातांतील गदा माझ्या मार्गांत आडवी आली नाहीं—ह्याहि आनंदी दिसताहेत—मातांनो आपल्या आशीर्वादानें ही आपली कन्या उभय कुलांची कीर्ति वाढवील बरें.

पद २६–( राग मिश्रमांड; ताल केरवा. )

ललित विलासें रमविन पतिला, पांडुकुमारा, धनुर्धरा; सहज विनोदें करिन सुखमय दारुण संसारा ॥ धृ० ॥ पांडव सासर, यादव माहेर, हा योग खरा; चढविन गगनीं कळसा, उभय कुळांची प्रशंसा, अजरा अमरा ॥ १ ॥

( दुसरा अंक समाप्त. )

# अंक तिसरा



## प्रवेश पहिला



[ स्थळ रैवतक पर्वत. नारद व चंद्रप्रभा येतात. ]

**नार०**—चंद्रप्रभे, आज सायंकाळच्या आंत सुभद्रा उपवासाच्या त्रासांतून सुटावी, असा माझा होरा आहे; पण कोणास ठाऊक काय होतें तें—काळजी करणें भाग आहे—उपवासामुळें सुभद्रा मनानें खचली नाहींना ?

**चंद्र**—मनानें खचल्या नाहींतच; उलट शरीरानें अधिक टवटवीत झाल्या आहेत. त्यांना पाहिलें तर काल व आज त्या अन्नाला किंवा पाण्याला शिवल्या देखील नाहींत हें कोणाला खरेंच वाटायचें नाहीं.

**नार०**—सत्यसंकल्पाचा त्राता परमेश्वर आहे. सद्वासनेचें तेज तेंच ब्रम्हतेज—हें तेज चमकूं लागलें म्हणजे करारी मनाला परमेश्वरी सत्तेंत भागी मिळाली म्हणून समजावें.

पद २७–( राग मालकौंस; ताल त्रिवट. )

आवरण देव वासनेला, सत्पात्रीं सजवित धारणेला ॥ धृ० ॥
निश्चयें तनुवरि बेतला, प्रेमें चिकटविला, ईश–वेष शोभला ॥ १ ॥

श्रीकृष्णाप्रमाणें सुभद्राहि वरच्या कोटींतली आहे, समजलीस ?

**चंद्र०**—तसें नसतें तर आपल्या सारख्या सत्पुरुषांनीं त्यांची काळजी कां वाहिली असती ?—पण बलराम दादा—

**नार०**—बलराम फार सज्जन, श्रीकृष्णाहूनहि अधिक सज्जन—फार सज्जन—पण जरा आडमुठया—( बलराम येतो )

**बल०**——आडमुठया बलराम आहे–नारदमुनि, आपणहि सुभद्रेच्या बाजूचे झालेले दिसतां–सुभद्रा वरच्या कोटींतली–कृष्ण वरच्या कोटींतला–मी आडमुठया–नांगऱ्या–गदा खालीं ठेवून जेव्हां हा हलधर एखादा जड नांगर चार बैलांच्या चौकडीसकट उचलून धरून शत्रूवर उगारतो–तें भयंकर स्वरूप सुभद्रेनें पाहिलेलें नाहीं–म्हणून गमजा चालल्या आहेत–मी आडमुठया–मी नांगऱ्या ?

**नार०**——तसें नव्हे बलरामा, पृथ्वीचें सर्व बल तुझ्या मनगटांत सांचलेलें–तुझ्यापुढें बिचाऱ्या सुभद्रेचें काय चालणार ?

**बल०**——बिचारी सुभद्रा–गोगलगाय अगदीं–बिचारी सुभद्रा–सुदर्शनावर बाण सोडणारी बिचारी–नारदमुनि, आपणाला सांगून ठेवतों–मनांतल्या मनांत मला काळजी वाटते–ही धनुर्धारी बायको मला नको असें त्या गदाधारी कौरवानें म्हटलें तर कसें——

**नार०**——बरोबर आहे बलरामा–मलादेखील हीच भीति वाटते. मी जर गदाधारी नवरामुलगा झालों तर धनुर्धारी मुलीला झिडकारल्यावांचून रहाणार नाहीं-गदेचें आणि धनुष्याचें जमायचें कसें ?

**बल०**——नाहींच जमायचें. मला माहीतच आहे. नाहींच जमायचें–मीं आतां सुभद्रेच्या हातांतले धनुष्यबाण घेतले काढून–आणि तें धनुष्य–ते बाण–तो दंड–तो कमंडलू–दिले सर्वच्या सर्व त्रिमूर्तीच्या गुहेंत फेकून. ताकीद दिली आहे त्यांपैकीं कोणत्याहि जिनसाला पुन्हां हात लावशील तर खबरदार–ही आली येथेंहि सुभद्रा ( सुभद्रा येते ) पुन्हां आपल्या देखत ताकीद देतों–सुभद्रे, नीट ऐक, त्या धनुष्याला किंवा बाणाला तूं शिवतां कामा नाहीं. धनुष्यबाण हे बायकांचे खेळ नव्हेत–अग पोरी अन्नपाण्यावांचून उद्यां जर तुझा जीव तळमळूं लागला आणि कौरवांच्या नांवानें जर तूं हंबरडा फोडलास तर असली धनुर्धारी बायको मला नको असें तो कौरवेश्वर साफ

बोलेल–पुढचा पेंच हा असा आहे. नाहीं समजलें-नाहींच समजायचें–धनुर्विद्या आणि अश्वविद्या त्या कृष्णापासून शिकलीस; त्याऐवजीं जोर कसे काढायचे, उठाबशा कशा काढायच्या, कुस्तीचे पेंच कोणचे, हें सर्व जर आम्हा यादवांच्या आखाडयांत शिकली असतीस तर–आम्हा यादवांचें कुळ म्हणजे पैलवानांचें कुळ–कुलकलंक मुलगी निपजली ही नारदमुनि–अग मेरुपर्वताप्रमाणें ज्याच्या पैलवानी मांडया शोभत नाहींत असला पुरुष संसारांत कोणत्या कामाचा ?

**सुभ०**—सूर्यापुढें मेरुपर्वताची–पृथ्वीच्या टेंगळांची काय किंमत ? गगनांत संचार करणारा वीरच मला प्रिय आहे–दादा, धनुर्विद्येचा योग्य सत्कार करणारे आपण असतां तर पृथ्वीकडे नुसते डोळे लावून गगनांत फिरणाऱ्या यंत्रांतील मत्स्यभेद करण्याचा पणच माझ्या स्वयंवराकरितां आपण लावला असता–आपण तसें केलें नाहीं आणि पांचालीचें साधलें–पांचालीच्या स्वयंवराचेवेळीं मी द्रौपदीच्या मागें मनानें उभी होतें, आणि मत्स्यभेद झाला त्याचवेळीं मीं मनानें त्यांना वरिलें—

**बल०**—मनानें वर नाहीं तर जीवानें वर–उपाशी तळमळून मरण्याची पाळी आली म्हणजे कौरवेश्वरच आवडूं लागेल. सुभद्रे, तुझ्या धनुर्विद्येंतील करामतीची कायती मला भीति उरली आहे. तुझा हा पराक्रम जर कौरवांना समजला नाहीं तर सर्व गोष्टी आपोआप माझ्या इच्छेप्रमाणें घडून येतील अशी मला खात्री वाटत आहे–सुभद्रे, तूं आपल्या पराक्रमाचा उच्चारहि करतां कामा नये.

**सुभ०**—मी कशाला उच्चार करूं ? त्यांत मला कोणतें सुख आहे ? त्यांनीं आपण होऊन जर प्रशंसा केली तर दोन बोटें स्वर्ग उरलासा मला वाटेल–प्रियकरानें केलेलें प्रशंसन म्हणजे बायकांच्या जीवाचें भोजन होय–बायकांची जीभ स्वतःचे तुकडे चघळत नसते–दादा, मी माझ्या शरसंधानाचा उच्चार तिकडच्याशिवाय कोणापाशींहि करणार नाहीं.

**बल०**—हिला समजत नाहीं तें हेंच समजत नाहीं. अग शरसंधान हें कुमारींना लांछन आहे–हें लांछन जर अर्जुनाला समजलें तर–पार्थ झाला तरी मोठा अभिमानी आहे–अग पांडवहि तुझा स्वीकार करणार नाहीं. ही गोष्टहि ह्या पोरीला समजत नाहीं कशी नारदमुनि ? हिची सगळी वागणूक कुमारीच्या प्रतिष्ठेला उलटी. हें खुळ यादवांत इतक्या दिवस नव्हतें. शरसंधान करणारी सुभद्रा–उपाशी सुभद्रा–यादवांच्या घराण्याची उलथापालथ झालेली मी माझ्या डोळ्यांनीं पहात आहें असें सुभद्रेला पाहिली कीं मला वाटतें.

**सुभ०**—गोकुळांत तर श्रीकृष्णामुळें उपवासाची चाल पडली आणि आपण उभयता बंधूंनीं सांदीपनी ऋषीच्या आश्रमांत धनुर्विद्या शिकण्यांत बराच काळ घालविला आहे.

**बल०**—मी मुळींच शिकलों नाहीं. त्याहि शाळेंतला वेळ मी तालीमबाजी करण्यांत घालविला–सटरफटर कांहीं थोडकेंसें कृष्ण शिकला–पण यादवांच्या रक्ताला तें विष झेपणार नाहीं म्हणून त्यानें तें सर्व तुझ्यापुढें ओकून टाकलें–तुझें लग्न होऊन तूं दुसऱ्या घराण्यांत गेलीस,–रथी–महारथी–अतिरथी ह्या रोगांतून यादवांचें कुळ पुरतें सुटेल—

**नार०**—मग जाऊं द्या हा रोग त्या रथी महारथी पांडवांच्या घरांत–विषानें विष शमतें म्हणून म्हणतों—

**बल०**—नाइलाज म्हणून तो शेवटचा जाज्वल्य उपाय–मी नाहीं त्याचा आतांच विचार करणार–पण विषानें विष–पांडवांच्या घरांत मूळचें पुष्कळ असलें तरी आणखी भर त्यांत ते कशाला घालतील–सुभद्रे, तुझें मौनव्रत होतें तें अधिक बरें होतें- ह्या उपासमारीनें तुझी शुद्धि गेली आणि मी धनुर्धारी आहें म्हणून बरळूं लागलीस–नारदमुनि, उपवासानें ही बरळूं लागणार–मग हिचें लग्न कसें होणार ? गोकुळांत उपवास करणाऱ्या कित्येक मुली आमच्या लहानपणीं कृष्ण–कृष्ण म्हणून बरळत असत–अजून त्या

उपवासच करीत आहेत आणि जशाच्या तशा अविवाहित आहेत–नारदमुनी, ही आमची बहीण जन्मभर अविवाहित रहाणार किं काय ? उपवास सोडलास तर कांहीं लग्नाची आशा–कोणी तुला हें उपवासाचें वेड लावलें ?

**सुभ०**—कृष्णामुळें गोकुळांत उपवासाचा प्रघात पडला ना ? मग द्वारकेंत तोच प्रघात पडला तर त्यांत कोणतें बिघडलें ?–कृष्णामुळें—

**बल०**—कृष्णामुळें–कृष्णामुळें–मीं मघाशीं एकदां ऐकून घेतलें, आतां नाहीं ऐकून घेणार–आम्हां यादवांच्या रक्ताला उपवासाची खोड नाहीं–मी कृष्णाचा थोरला भाऊ आहें. बहिणीपेक्षां भावाला घराण्याच्या रक्ताची अधिक चांगली ओळख असते. अग कदाचित् पचणार नाहीं म्हणून यशोदेनें जरा कमी दूध दिलें तर शेजाऱ्याचे घरांत रांगत जाऊन मडकीं फोडून दहिलोणी चोरून खात असे आणि किती–नारदमुनी–नाक–डोळे, गाल–कान भरून जातील अशी चोरी करणारा तो खादाड–यशोदेला वाईट वाटे आणि कृष्णाला दुसऱ्याचे घरांत जाऊं देत नसे–मग त्या गोपी उपवास करीत आणि कृष्णा, कृष्णा म्हणून आमच्या दारापुढें बरळूं लागत–हा खादाड आणि त्या उपवासी–बायकांची बेअक्कली जात—

**सुभ०**—गोजिरवाणें रांगतें मूल दृष्टीस पडेनासें झालें म्हणजे अन्न-पाण्याकडे लक्षच जाऊं नये, हा गोपींचा कसा अपराध होतो ?–आपल्या मनोरथांना थोडथोडा प्रत्यक्ष आकार येऊं लागावा आणि सर्व आशा एकदम विफल व्हाव्यात, कोण अन्न खात बसेल आणि पाणी पिऊं शकेल ? मनो-रथांशीं अशा रीतीनें एकजीव झालेली बुद्धि म्हणजे उपवासाची भक्ति होय.

**पद २८–( राग सोरट; ताल झपताल. )**

पाहुणा जीव आला, ईशाचे घराला; अन्नदानें वश केला ॥ धृ० ॥
देव दिसेना पंक्तिला; जीव रुसला, उपाशी बसला; घरंदाज पावला तपाला ॥ १ ॥

दादा, उपवासामुळें देव मला पावेल, निदान कांहीं वाईट तरी होणार नाहीं– गोपी तरल्या–तरत आहेत–मीहि तरणार–तरतच आहें—

**बल०**—उपाशी मरणार–मरतच आहेस–कर, एकादशीला उपवास कर, द्वादशीलाहि कर–सोमवार कर, मंगळवारहि कर–ही हट्टवादी आपण होऊन आपल्या पायावर दगड पाडून घेत आहे. पण आम्ही गुरुजनांनीं हिचा कांहीं बचाव केला पाहिजे ना ?–म्हणून नारदमुनी, मी आपल्याकडे रैवतक पर्वतावर मुद्दाम आलों आहें !

**नार०**—अशा कामीं मदतीला मी नेहमीं तयार असतों.

**बल०**—आपण माझें एक काम केलें पाहिजे–ही धनुर्धारी कुमारी आहे, ही बातमी बाहेर कोणालाहि कळतां कामा नये. सर्व विश्वांतल्या बातम्या कोणाला कोठें केव्हां फोडावयाच्या, कोणत्या मागें ठेवायच्या, कोणत्या पुढें ढकलायच्या, पुढच्यांना सजवायचें कोणत्या नजरेनें, मागच्यांना दाबायचें कोणत्या धोरणानें हें काम आपणाकडे श्रीविष्णूनें दिलें आहे, तेव्हां म्हणतो आमची ताई धनुर्धारी आहे ही बातमी दडपून टाकून—

**नार०**—तो बंदोबस्त मी करतों–ज्यांना ही बातमी शिळी आहे, त्यांच्या-शिवाय इतर कोणालाहि ही बातमी जन्मांत समजणार नाहीं–पुढच्या जन्मांत कालांतरानें घरोघरीं उपाशी अवतार दृष्टीस पडल्यावर एखाद्यानें पोटासाठीं बाहेर फोडली तर फोडली–पण सध्यां तरी आपण काळजी करणें नलगे—

**बल०**—हें झालें तरी देवकार्यच आहे–तुम्हा आम्हाला माहीत आहे श्रीविष्णु गदाधारी आहेत, रुद्राप्रमाणें धनुर्धारी नाहींत–संहाराचे वेळीं रुद्राव-तार ! इतर वेळीं शत्रूचा हात आपल्या हाताला लागल्यावर कुस्ती–शत्रू दूर असतांना लढाई नाहीं–धनुर्विद्या जर बायकांनीं माजविली–तर तर–उद्यां विमानांतूनहि पृथ्वीवर बाणांचा वर्षाव होईल.–आलें ध्यानांत–दुरून ठार मारण्याची विद्याच नष्ट झाली पाहिजे–नाहींतर पृथ्वीचा तरणोपाय नाहीं—

**सुभ०**—तसें कांहीं नाहीं—धनुर्विद्येनेंच मनुष्याचें लक्ष गगनाकडे जातें—पृथ्वी, अंतरिक्ष व गगन ह्यांचा मिलाफ करून परमेश्वराला पोंचविणारा पूल कसा बांधतां येतो, हें त्रिपुरांच्या युद्धाचे वेळीं श्रीशंकराच्या धनुष्यानें सर्व वीरांना शिकविलें आहे. त्यांनीं शंकराला प्रसन्न करून आपलें धनुष्य मिळविलें आहे. निर्दयांच्या पायमल्लींतून पृथ्वीला सोडविण्याचा हा राजमार्ग श्रीविष्णूला कसा नापसंत होईल?

**बल०**—गप्प बैस सुभद्रे, तुला कांहीं समजत नाहीं—ह्या धनुर्विद्येमुळें पृथ्वीवरील वीरांचा मोठा संहार होणार—पण तसें झाल्याशिवाय गदेखेरीज दुसरें शस्त्रच कोणाच्या हातांत असतां कामा नयें, हा नियम कोण पाळणार? ती फार पुढची काळजी—धनुर्धारी मुली जन्मभर विवाहाला मुकायच्या—ह्या सुभद्रेचें लग्न तरी होतें आहे कीं नाहीं—कौरवांशीं होवो नाहींतर पांडवांशीं होवो—हिचें निदान लग्न तरी झालें पाहिजे ना नारदमुनी?

**नार०**—दादा, ती काळजी नको—उगीच त्रास करून घेऊं नका—आपण आतां रैवतक पर्वतावर राहूंच नका—द्वारकेंत जाऊन स्वस्थ विश्रांति घ्या—येथें मी आहें, श्रीकृष्ण आहे, रेवतीवहिनी आहेत—वेळ आली म्हणजे चुटकीसरसी लग्न लावून टाकूं—

**बल०**—तुम्ही सर्व समर्थ आहां—पण ही आहेना हट्टवादी—अर्जुनाशीं लग्न झालें तरी भोजन समारंभाचे वेळीं ही उपाशीच राहील! सांगा, किती मी हिची काळजी करूं? अन्नपाण्याशीं नवऱ्याचा कांहीं संबंध येतां कामा नये म्हणून आग्रह धरला, काय करायचें? काय ग सुभद्रे, लग्नसमारंभांत अर्जुनाला तरी दोन घांस देशील का आणि त्याच्या हातचे दोन घांस खाशील का?

**सुभ०**—लग्नसोहाळ्यांत तिळभर कमी पडलेलें कोणत्याहि नवऱ्यामुलीला खपत नाहीं दादा.

बल०—हें भाग्यच समजलें पाहिजे–एवढा तरी खादाडपणा शिल्लक आहे म्हणावयाचा !–नारदमुनी, मी आतां उगीच काळजी करीत बसत नाहीं–तुम्ही म्हणतां तसें कां होईना, आली वेळ तर चुटकीसरशी लग्न लावून टाका–अर्जुनाशीं तर अर्जुनाशीं–जातो मी आतां द्वारकेकडे–पहा बरें सुभद्रेचें जर लग्न झालें नाहीं तर अविवाहित कुमारकुमारींचा अनर्थ पृथ्वीला गांजून सोडील–म्हणून पुन्हां बजावतों तुम्हां सर्वांना, हिच्या शरसंधानाची बातमी बाहेर फुटतांच कामा नये. [ बलराम जातो.

नारद० — मिळविली कशीबशी संमति तुझ्या लग्नाला अर्जुना.

चंद्र०—येथें उभ्या आहेत सुभद्राताईसाहेब !

सुभ०—कोठें आहेत ते ?–येथें जवळ आहेतसें आपणाला वाटलें–कोठें आहेत ते, सांगा मला–आपल्या दिव्यदृष्टीला आतां दिसलेना ? सांगा मला कोठें आहेत ते ?

नार०—मला दिसलें बिसलें कांहीं नाहीं–घांस देण्याच्या समारंभाची आठवण दादांनीं करून दिली, आणि आज रात्रीं श्रीकृष्णानें मला ज्योतिर्लिंगाचे मंदिरांत भोजनाला बोलावलें आहे–मोठा थाटमाट आहे–त्याचें स्मरण होऊन अन्नाच्या रसानें जीभ भिजली म्हणजे कांहींतरीच बोलते! सुभद्रे, जातो मी, मौननाथ भोजनाला येतील का, म्हणून चौकशी करायला श्रीकृष्णानें सांगितलें आहे.

सुभ०—कोठें आहेत तें आपण नाहीं सांगत–मौननाथ तरी सांगतील का ?

नार०—तें मला कसें ठाऊक असणार ? तूं त्यांना बोलवलेंस तर सांगतील—

सुभ०—मी त्यांना बोलवूं कशी ?

नार०—बोलीव म्हणजे बोलतील–त्यांत काय इतकेसें ! [ जातो

**सुभ०**—चंद्रप्रभे, ह्यांच्या मागोमाग दोन पावलें जाऊन कांहीं सांगतात का बघतें—तूं ही जेवणाची धामधूम काय आहे, सर्व बातमी काढ व मला येऊन सांग. [ जाते.

**चंद्र०**—नारदमुनींना मोठ्या थाटाची मेजवानी व ती येथें रैवतक-पर्वतावर काय म्हणून ? ज्योतिर्लिंगाचे मंदिरांत निरनिराळ्या पक्वान्नांच्या राशीवर राशी पडूं लागल्या आहेत, त्या पाहून मला वाटतें लग्नसमारंभाकरितां ही तयारी असावी.

पद २९–( राग कॉफी; ताल दादरा. )

थाटमाट लग्नाचा; थांग नसे वराचा ॥ धृ० ॥ समय कसास लावियला, कृष्णाचे ममतेचा ॥ १ ॥

ताईसाहेब उपाशी आणि मोठ्या लग्नाची ही असली तयारी ! चमत्कार आहे बाई ! ज्योतिर्लिंगाच्या मंदिरांत गेलें म्हणजे कळेल सर्व आपोआप. [ जाते.

**सुभ०**—( प्रवेश करून ) नारदमुनी कांहीं केल्या सांगत नाहींत. ते कोठें तरी आसपास असले पाहिजेत. नारदमुनींना माहीत आहे. तिकडचं नांव घेऊन कशी हांक मारूं—कृष्णाला माहीत असलें पाहिजे. बलरामदादा रागावले—पाय आपटले—तरी माझ्या लग्नाचें कसें होईल ह्याची काळजी आहे त्यांना—कोवळ्या मनाचे आहेत—पण कृष्ण—ही मी अशी उपाशी—उन्हा-तान्हांत—एकटी वणवण फिरते आहें, जरा तरी विचारपूस ?—नाहीं, तोहि कोंवळ्या मनाचा आहे, त्याला माहीत असलें पाहिजे, ते येथेंच कोठें तरी आहेत म्हणून—माझ्या मनालाहि वाटतें—अगदी मी त्यांच्याजवळ आहें आणि ते माझ्याजवळ आहेत—

पद ३०–( राग पहाडी; ताल केरवा. )

निकट पति वाटे ठाकला; विरह मग कां हो मातला ॥ धृ० ॥ नयनें नयना नाथ भेटला, दूर दूर नरवर लोपविला; नवल नवल संगमीं विरह आला ॥ १ ॥

एकमेक एकमेकांच्या जवळ असून एकमेकांची गांठ नाहीं असा हा चमत्कार आहे. कोण मला सांगेल हें कसें तें—मौननाथांचे पाय धरले तर ते सांगतील का—ते बोलतील का माझ्याशीं—मौननाथांचे डोळे—परवां ओळखीचे दिसले—काल मला सुभद्रे बोल म्हणाले—तिकडच्यासारखा आवाज वाटला. मी बोलूं लागलें—ते तेच आहेत का—नाहींतर त्या आवाजाची माझ्यावर अशी हुकमत कशी चालली असती—मग त्यांनीं आपण होऊन मला जवळ घेऊन माझ्याशीं कां बोलूं नये—त्यांनीं नाहीं मला जवळ घेतलें तरी मी त्यांना जवळ घेईन. मग बोलल्याशिवाय कसे रहातील ? बोलतील का, म्हणून नारदमुनींना विचारलें, बोलीव म्हणजे बोलतील असें उत्तर आलें—त्यांना मी जवळ घेतल्यावर मी बोलवीन—मीं बोलविल्यावर बोललें पाहिजे सांगून ठेवतें. मी जसें बोलवीन तसें बोललें पाहिजे—पोपटाला बोलविल्यासारखें बोलवीन. पोपट, मी बोलवितें आतां हं—पोपट पोपट—बोलायचें होतें गडे—पोपट—पोपट—नाहीं बोलत ? नाहींच बोलायचे—सुभद्रे शुद्धीवर आहेस का ? पोपट म्हणून हाताच्या बोटावर त्यांना खेळविणारी एवढी मोठी तूं कोण ? सुदर्शनाला बाण मारलास खरा—पण तिकडून पोपट होणें कधींहि व्हावयाचें नाहीं—असला दांडगेपणा नाहीं चालावयाचा हो त्यांच्यापुढें !—ते नाहींत पोपट—मीच त्यांच्या पिंजऱ्यांतील मैना आहें—मी मैना, आपण बोलविते धनी—बोलवायचें होतें आपल्या आवडत्या मैनेला—जरा मोठ्यानें बोलवायचें—पहा आतां मैना कशी जशाचें तसें बोलते ती—बोलूं ? सगळें—अगदीं तसें—सगळें बोलतें.

पद ३१—( राग भैरवी; ताल केरवा. )

बोला बोला हो सख्या, तुम्हीच बोला; बोलवूं कसें, जाणत नसे; बोल हृदयींचा प्रेमें बुडविला ॥ धृ० ॥ मधुरहि कंठ नसे माझा चतुरहि बोल नसे माझा; अबोला अबला-बोल-माला ॥ १ ॥

डोलूं लागलां मैनेला बोलतांना ऐकून (पडद्यांत–ताईसाहेब, ताईसाहेब श्रीकृष्ण तुम्हाला बोलावत आहेत; या लौकर) हो, हो, बोलावायचेच श्रीकृष्ण मला यावेळीं–ही मीं आलेंच. [जातें.

## प्रवेश दुसरा.

(स्थळ–रैवतक पर्वताचा एक भाग; भैरवनाथ व मेघनाथ प्रवेश करितात.)

**भैर०**—अगदीं लंघलों आहें–उपवास केव्हां सुटेलसें झालें आहे–नारदमुनि सायंकाळीं तीन दिवसांचा उपवास सोडणार आहेत म्हणे.

**मेघ०**—गगनांत राहणाऱ्या ऋषींना काय–त्यांचें थोडेंच जिभेनें खाल्याशिवाय पोट भरावयाचें नाहीं ?–अन्नाकडे नुसतें पाहिलें किंवा नुसतें मनांत अन्न आणलें म्हणजे त्यांचें पोट भरतें–हाल आहेत माणसांचे–मण दोनमण अन्नाचे गोळे घशाखालीं उतरल्याशिवाय माझें पोटच भरत नाहीं; संध्याकाळपर्यंतची वेळ तरी मी उपाशी कशी काढूं ? देवांनीं आणि ऋषींनीं उपवास माणसांच्या मागें लावले, माणसांचा सुखाचा जीव दुःखांत टाकला—

**भैर०**—माणसामाणसांत बायकांपेक्षां पुरुषांचे हाल फार अधिक–बायकांना उपवास मानवतात–सुभद्रादेवी उपवास करतात, आम्हीहि उपवास करूं लागलो–जीवावरच बेतली आहे.

**मेघ०**—सुभद्रादेवींना उपवास मानवला आहे, त्यांच्या दासीहि इकडून तिकडे भिरवीत फिरत आहेत–आम्ही दोघेच लंघून मृतप्राय झालों आहों–अरे ही दासी कांहीं फलाहार घेऊन इकडेच येत आहे–ही चोरून कांहीं खाण्याच्या बेतांत आहे–तरी म्हटलें बायकांना उपास मानवतो कसा—

**भैर०**—उपास करून धष्टपुष्टच्या धष्टपुष्ट–चोरून खात असल्या पाहिजेत–दिवसा नाहीं तर रात्रीं–एरव्ही गब्दूल गरगरीत कशा दिसतात ?

**मेघ०**—आमचीं तेवढीं हाडें उपासानें बाहेर पडलीं—आपणहि चोरून खाऊं या—

**भैर०**—चोरी सोडली, सुभद्रादेवीच्या पायावर हात ठेवून चोरी सोडली—चोरीचा मार्ग आतां बंद.

**मेघ०**—मग भीक मागून खाऊं या—ही आली, हं ( दासी येते ) लाग मागायला भीक—'सात जन्मांचा उपाशी, पोट लागलें पाठीशीं—पडल्या अन्नाच्या राशी—उपास मरतो उपाशी—तुम्ही द्याहो कांहीं खायाला'—

**भैर०**—'अन्न तुम्हापाशीं, जिवंत करा आम्हाशीं—तुमचे पोट गगनाशीं भिडेल क्षणासरशी—तुम्ही द्याहो कांहीं खायाला.'

**दा०**—तुम्हाला कांहीं मिळायचें नाहीं—मला कोण उपास लागला आहे—जीव कासावीस झाला—तेव्हां मी नारदमुनींना विचारलें जगूं का मरूं—मला ते म्हणाले तूं अगदीं साधी भोळी आहेस—मी म्हटलें होय—तशीच मी साधी भोळी आहें. ते म्हणाले, ताईसाहेब आतां इतक्यांत मौननाथांच्या दर्शनाला जातील आणि लगेच सगळयांचाच उपवास सुटेल. घटकाभर कळ काढ—मी म्हटलें पळभरहि नाहीं. जगूं का मरूं ? तेव्हां त्यांनीं दयाळू होऊन मला केळीं आणि नारिंगें दिलीं ! एकटीनें खाऊं का म्हणून विचारलें—तुला एकटीलाच दिलीं आहेत असें ते म्हणाले—मीं बहुतेक सर्व फळें खाऊन टाकलीं—दोनच केळीं उरलीं आहेत—

**मेघ०**—'एकच घांस अन्नाचा, दाविल मार्ग स्वर्गाचा, प्याल ओघ अमृताचा, ऐसा प्रभाव पुण्याचा—तुम्ही द्याहो कांहीं खायाला'—

**भैर०**—'उपास बायांचे खरे, देव येतील सामोरे, सजती जणूं नवरे, देती हारतुरे—तुम्ही द्याहो कांहीं खायाला'—

**दा०**—मी कोणाला कांहीं द्यायची नाहीं—एकटीच खाणार, नाहीं तर नारदमुनी रागावतील—मी आहें साधी भोळी—एकटीच खाणार—

पद ३२–( राग गझल; ताल केरवा. )

बाई मी साधी भोळी, सोलून खाते केळीं; पुरुषांना देतें साली, साधी भोळी ॥ धृ० ॥ साली मऊ फार, जणु चपलांचा मार; तोंड उघडाल, खबरदार; उपाशीं साधी भोळी ॥ १ ॥

[ जाते.

**भैर०**—साली आल्या आमच्या वाटणीला—

**मेघ०**—कांहीं नाहीं त्यापेक्षां साली बऱ्या–आपण सालीहि सोलून खाऊं– फळांच्या सालींत व तांदुळाच्या कोंडयांत खरें अन्न असतें–आतां एकच घटका उपवासाची उरली आहे–त्या पहा ताईसाहेब श्रीकृष्णाला भेटून मौन-नाथांच्या दर्शनाला निघाल्या—

**भैर०**—हें दर्शन झालें कीं उपवास सुटला–चल, साली चघळत त्रिमूर्तीच्या गुहेच्या आसपास ही घटका रेंगाळत काढूं.

**मेघ०**—म्हणजे पारण्याचेवेळीं दत्त म्हणून हजर. [ जातात.

---

## प्रवेश तिसरा

[ स्थळ—त्रिमुखी गुहा–अर्जुन प्रवेश करतो ]

**अर्जु०**—अजून कशी सुभद्रा येत नाहीं ! आतां इतक्यांत येईल म्हणून नारदमुनी म्हणाले–मला एकएक पळ म्हणजे युगाप्रमाणें वाटत आहे–विरही मनाच्या यातना नारदाला माहीत नाहींत–त्यांत काय आहे असें त्यांना वाटतें– तूं बोलूं नकोस, चालूं नकोस, डोलूं नकोस–आपोआप सुभद्रा तुझ्यामागें लागून येईल, आर्जव करील, पाय धरील ! मी नाहीं आतां नारदाचें काडी-मात्रहि ऐकणार–मला हें गप्प बसणेंच सोसवत नाहीं–मी अस्सा उभा रहाणार,

सुभद्रेचा सुगावा काढून तिच्या मागें फिरणार–तिच्याशीं बोलणार–तिचीं आर्जवें करणार–तिचे पाय धरणार–आतां नाहीं गप्प बसणार—

पद ३३–( राग कर्नाटकी; ताल एकताल. )

जीवनीं संचारली, सबलमदा नाचली, चपल शक्ति धांवली ॥ धृ० ॥ आसन फेटाळुनि, ताठ उभी कुंडलिनी, सरसावली ॥ १ ॥

आतां मी संन्यासी उरलों नाहीं–अर्जुन झालों–पण सुभद्रा कां अजून येत नाहीं?–तिनें अन्न सोडलें आहे–शक्ति अंगांत नसेल–चालवत नसेल–वाटेंत दमून कोठें तरी बसली असेल–काय हें नारदा, तूं काय हें केलेंस–हा अर्जुन, हा धनुर्धारी वीर, सुभद्रेला सुखी करण्याकरितां ह्या रैवतक पर्वतावर उभा असतांना सुभद्रेचे हे असे हाल! पाताळांतील पाणी एक बाण मारून वर काढण्याचें सामर्थ्य ह्या बाहूंत असतांना, तहान लागली म्हणून डोळयांतून टिपें गाळीत एखाद्या झाडाखालीं रडत बसण्याची पाळी मला आलिंगन देण्याकरितां धांवत येत असतांना सुभद्रेवर यावी अं! लग्नाच्या जुळवाजुळवींत साधुसंतांना मीं पडूं दिलें, भोग पार्था आतां आपल्या चुकीचे परिणाम–अर्जुनाचे हे असे हाल आणि सुभद्रेचे ते तसे हाल–विश्व उत्पन्न कसें झालें आणि लयाला कसें जाणार ह्याची इत्थंभूत हकीकत श्रीरागांत किंवा भैरवींत सुंदर आलाप घेऊन नारद गाऊन दाखवितील, पण प्रेमालिंगनाचे वेळीं जरा उशीर लागला असतांना अर्जुनाच्या प्राणांची कशी तडफड होते आणि सुभद्रेचा जीव कसा कासावीस होतो ह्याची काय कल्पना ब्रम्हचारी गोसावड्यांना असणार?–ब्रम्हचाऱ्यांची, साधुसंतांची, किंवा संन्याशांची सावलीहि विवाहाच्या आसपास शेदोनशें योजनें पडूं देतां कामा नये, एरवीं वधुवरांना सुख मिळावयाचें नाहीं.

पद ३४–( राग मालकौंस; ताल त्रिवट. )

मला कला विचुका विफला दावुनिया मुनी गेला ॥ धृ० ॥ उलट भासते जग नारदाला, प्रेम–सुखा नच दावी जीवाला ॥ १ ॥

सुभद्रेला उपवास करायला लावून नारदानें माझी चेष्टा आरंभली आहेसें दिसतें—नारदानें मला फसविलें आणि ह्या छाटींत गुंतविलें खरें पण सुभद्रेनें कां फसावें ?—इंद्रहि ज्या धनुर्धराला साहाय्याला बोलावितो आणि कैलासाचा राणा श्रीशंकर ज्याला प्रसन्न, अशा प्रख्यात वीराची बायको उपवासाच्या फंदांत सांपडण्याइतकी भोळसट असतां कामा नये, एवढें देखील सुभद्रेला समजूं नये ?—इतकी अक्कल कशी तुला नाहीं, अशी भोळी तूं कशी—नवऱ्यापेक्षां इतरांची छाप तुझ्यावर काय म्हणून ?—असा गुरगुरून आतां आंगावर जातो सुभद्रेच्या—काय उत्तर देणार ?—आली कीं असें बोलून घेतों—पुन्हां जन्मांत एक घटकाभरहि उपवास करणार नाहीं—( पडद्यांत मुरलीचा ध्वनि ) आली वाटतें—आतां सपाटून बोलून घेतों—माझ्या जिभेचा पट्टा सुरू झाला म्हणजे सुदर्शनावर बाण सोडणाऱ्या तिच्या हाताच्या कौशल्याला केरसुणीनें झोडपल्यासारखें होऊन पाणिग्रहणाला अडथळा उरणार नाहीं—अर्जुना, आतां बोलण्यांत कसूर नको—भडिमार सुरू होऊं द्या.—पण सुभद्रा नसावी—मुरलीचा आवाज ऐकूं येत आहे—श्रीकृष्ण आला वाटतें मला भेटायला. असेना का, श्रीकृष्ण असेना—सुभद्रा काय श्रीकृष्ण काय—तिची नाहीं तर त्याची हजेरी घेतों—तुझी बहीण माझी बायको आहे, माहीत नाहीं ? तिला उपवास कां घातलास ?—मला भेटायला कां आला नाहींस, लग्नाचे कां बोलला नाहींस—हुंडा मानपान करणी कां ठरविली नाहींस ? असा गांगरून सोडतों श्रीकृष्णाला, सुदर्शनाला शंभर बाण लागलेले पुरविले पण हा रुसलेला जांवई नको असें त्याला होऊन जाईल, आणि सुभद्रा जेथें असेल तेथें मला निमूटपणें क्षणांत घेऊन जाईल. हा आलाच श्रीकृष्ण [सुभद्रा मुरली वाजवीत येते.]—वा, वा, हा मुरलीचा मंजुळ ध्वनि ऐकत असेंच डोलत रहावेसें वाटतें—वा, वा, सुभद्रे, तूं श्रीकृष्णावर ताण केलीस—इतकी गोड मुरली त्याला कोठून वाजवायला येणार—गाई किंवा गोपी त्याच्या मुरलीला लुब्ध होतात, पण पुरुषांचें

मन खेंचून घेण्याचें सामर्थ्य त्याच्या मुरलींत नाहीं–तुझ्या मुरलींत तें सामर्थ्य आहे—

पद ३५–( राग सोहनी; ताल एक्का. )

नर-तनमन जयकर साधन झाली मुरली धृ० ॥ इतर नाद सकल सांडी, रंगविले सहज मला; मधुमधुरा नादकला, जादू नराला ॥ १ ॥

अशी गप्प कां मुरली–मुरलीच्या नादांत धुंद होऊन प्रहरानुप्रहर डोलत रहावेसें वाटतें–वाजीव मुरली–तूं बोलूंच नकोस–मी बोलतों–आणि तूं मुरली वाजीव.

**सुभ०**—पण मौननाथांनीं कसें बोलायचें–मौनव्रत आहेना ?

**अर्जु०**—अग मौननाथ उरला नाहीं–कंठ फुटला आहे–हो–हो—

**सुभ०**—हें काय बाई कांहीं तरीच—

**अर्जु०**—हो–हो–कंठ फुटला आहे–ह्या तुझ्या पोपटाला कंठ फुटला आहे आणि किती बोलूं असें मला झालें आहे–आतां तुझ्यापुढें बोलकानाथ उभा आहे.

**सुभ०**—( स्वगत ) ओळखलें, पुरें ओळखलें! मजपुढें प्राणनाथच उभे आहेत–आपण होऊन कबुली दिल्याशिवाय मी कशाला आतां ओळखतें ?

**अर्जु०**—मी आतां मौननाथ नव्हे–मग कोण मी–सांग पाहूं ?

**सुभ०**—नांव गांव सर्व कांहीं कळल्याशिवाय मी काय सांगूं ?–शिवाय इकडच्यासारखें मी जर कांहीं भलतें सलतें बडबडूं लागलें तर ते छाटीचे डोळे लाल होऊन मला जाळून टाकतील–त्या डोळ्याचें मला बाई भय वाटतें–छाटीमुळें मुखकमलाकडे पाहण्याचें धाष्टर्यच माझ्या डोळ्यांना होत नाहीं; मग कोण, काय, कसें सांगतां येईल ? छाटी अंगावरून काढून ठेवावयाची होती–नाहीं तर मी कांहींच बोलायची नाहीं—

अर्जु०—तूं कांहींच बोलूं नकोस–मी एकटाच एकसारखा बोलत रहातो–तूं एकसारखी मुरली वाजीव–मी बोलतों–वाजीव ना मुरली–नाहीं वाजवीत ! नाहीं वाजविलीस तरी चालेल–मुरलीच्या नादांतच मी बोलणार असें नाहीं–नारदाची तंबोरी ज्याप्रमाणें बोटाच्या स्पर्शाशिवाय सूर काढीत रहाते त्याप्रमाणें हा तुझा वीणाहि करांच्या स्पर्शाशिवाय तुझ्या मनांतले बोल आपोआप बोलणारा आहे–सुभद्रे, श्रीकृष्णाचे मुरलींत सर्व विश्वाचा प्राण भरलेला असतो, त्यामुळें ती मुरली वाजूं लागली म्हणजे सर्व विश्व स्तब्धपणानें ऐकत रहातें–तुझ्या मुरलींत माझा प्राण भरलेला आहे–तुझ्या हातांतच माझा प्राण आतां खेळत आहे–त्या मुरलीला हातांत अशीच खेळवीत रहा–तुझे ओठ त्या प्राणाला भिडले तर अमृतसिंचनानें तो टवटवीत होईल–नाहीं तसें करायचें–करपल्लवांच्या कुरवाळण्यानें तूं त्या माझ्या प्राणाला अगदीं लाडांत आणलें आहेस–आणि तुझ्या मनांतले लाडके विचार कोणाची भीडभाड न धरतां तो मोठ्यानें बोलूं लागला आहे–बोलवती तूं, बोलणारा मी–घेऊं बोलून आतां सगळें ! मी एकटाच बोलतों–तूं बोलूंहि नकोस आणि मुरलीहि वाजवूं नकोस–बोलूं सगळें !

सुभ०—आपलें बोलणें ऐकण्याशिवाय मला दुसरें कांहींच सुचत नाहीं–स्वप्नांत आहें का शुद्धीवर आहें, कळतच नाहीं–माझा श्वास तिकडच्या श्वासांत मिळाला आहे, जीव जीवांत मिसळला आहे, आणि प्राण प्राणांत मावळला आहे. अद्याप पाणिग्रहण झालें नसल्यामुळें मुरली कशीबशी धरून ठेवण्यास माझे हात स्वतंत्र आहेत; बाकी कोणताच स्वतंत्रपणा उरलेला नाहीं–बोला म्हणूं तरी कशी–नको बोलूं म्हणूं तरी कशी–स्वतंत्रच नाहीं—

पद ३६–( राग गझल; ताल धुमाळी. )

नाथ नेता हा मिळाला, लाभ सगळा लाभला ॥ ध्रु० ॥ डोल डोले, चाल चाले, नाच नाचे आपुला; शरण येई पराधीना विवश बाहुली व्याकुळा ॥ १ ॥

छाटी अंगावरून काढून टाकावी असें वाटतें—कारण हात स्वतंत्र आहेत—छाटी मीं काढून टाकली म्हणजे पाणिग्रहण होईल आणि पुरी परतंत्र होईन.

**अर्जु०**—नाहीं, मी तुझ्या हातांना तसें करूं देणार नाहीं—छाटी माझ्या अंगावरून दूर होईल ती माझ्या हातांनीं होईल—पण अगोदर मला बोलून घेतलें पाहिजे—सपाटून बोलून घेतों—रागारागानें बोलून घेतों—तडाख्यावर तडाखे, असें बोलून घेतों—पण काय बोलणार होतों बरें—आठवण कशी नाहींशी झाली—सांगना मी काय बोलणार होतों तें—करना मला आठवण—बायकांनीं जर पुरुषांना वेळेवर शुद्धीवर आणलें नाहीं तर बायकांचा काय उपयोग पुरुषांना—आणना मला शुद्धीवर—

**सुभ०**—स्वतःचें भान हरपल्यावर पुरुषांचा शहाणपणा बायका ठिकाणावर कशा ठेवूं शकतील?

**अर्जु०**—पुरुषांचा शहाणपणा हिरावून घेऊन पुरुषांना मूर्ख बनविण्याची हातोटी बायकांना साधते, पण मी तशांतला नाहीं—माझा शहाणपणा आतां ठिकाणावर येऊं लागला आहे—काय बरें मी बोलणार होतों.

**सुभ०**—आपल्या शहाणपणाची आठवण मला करून देतां येत नाहीं. ही मुरली कदाचित् तसें करूं शकेल—वाजवूं मी मुरली? वाजवूं (वाजवूं लागते)

**अर्जु०**—खबरदार मुरली वाजविलीस तर—वाजवूं नकोस मुरली—मी शहाणा होऊं लागलों आहें. तुझ्या नादानें वेडावून गेलों असलों तरी आतां वेडा उरलेलों नाहीं—नको वाजवूं मुरली—हट्टी आहेस, नको म्हटलें तरी वाजवतेस—उपवास करणें सोपें आहे पण नको म्हटल्यावर मुरली वाजविणें कठीण आहे. घेतों अशी तुझ्या हातांतून हिसकावून—( हिसकावून घेतो ) आतां माझ्या प्राणांची आणि तुझ्याहि प्राणांची शक्ति आली माझ्या हातांत—झालों मी सावध—आतां सगळें आठवलें—सांग मला प्रथम, तुझें संरक्षण करायला मी येथें सज्ज असतांना तू उपवास कां आरंभिलेस—हा अर्जुन—हा म्हणजे हा तो—दूर नाहीं हें तुला कसें समजलें नाहीं ?

**सुभ०**—इतपत तरी दोन दिवसांपूर्वी प्रगट व्हायचें झालें असतें—मी कशाला उपवास केले असते ? छाटी अंगावरची काढून व्हायचें आतां पुरतें प्रगट—काढूं मी अंगावरची छाटी ?

**अर्जु०**—एव्हांशींच नाहीं. प्रथम तुला शहाणपणा शिकवितों आणि मग—एव्हांशींच नाहीं—पहिली तुझी चूक उपवास सुरू केलेस—कबूल आहे?—कबूल कर—भोळसट बायको शहाण्या नवऱ्याला आवडत नसते—मुकाट्यानें कबूल कर चूक—

**सुभ०**—छाटी पांघरण्याच्या ढोंगापेक्षां खराखुरा उपवास काय वाईट—पण मी चूक कबूल करतें—छाटी दूर करायची होती—काढूं मी अंगावरची छाटी—

**अर्जु०**—असली घाई आतां चालायची नाहीं. तुझ्याप्रमाणें मीहि प्रेमाच्या आलिंगनाला उत्सुक झालों आहें—पण अगदीं थोडा वेळ ही छाटी तुझ्या आणि माझ्या आड राहूं दे—मीं शहाणपणानें ठरवलें आहे—सुभद्रेचें आणि अर्जुनाचें लग्न व्हायचें तें शांतपणानें, धीमेपणानें आणि व्यवस्थित रीतीनें झालें पाहिजे!—आला अर्जुन, धरला सुभद्रेचा हात, नेली पळवून, असला उच्छृंखलपणा बिलकूल उपयोगाचा नाहीं. घेतला बाण, लागला सुदर्शनाला, केला उपवास, आणि लागलें लग्न—असली घाई पुन्हां होतां कामा नये—कर कबूल ही घाईची चूक—

**सुभ०**—कबूल, हीहि चूक कबूल—सगळ्या चुका मला एकदम माफ करायच्या होत्या—काढून टाकायची ती छाटी लवकर—मी अधीर झालें आहें—आपल्या कराच्या स्पर्शानें माझे सर्व दोष नाहींसे होतील—पवित्र करून पदरीं घ्यायची होती मला—मी अधीर झालें आहें.

**अर्जु०**—अधीर मीहि झालों आहें—अधीर होणें ही कांहीं चूक नाहीं—पण घाई उपयोगाची नाहीं—ह्या घाईमुळें हा छाटीचा त्रिदंडी संन्यास माझ्या

मागें लागला—अशी फार जवळ येऊं नकोस—संन्यास तुला शिवेल! जरा दोन पावलें दूर हो—घाईनें केलें तें स्वस्थपणानें निस्तरलें पाहिजे—काय ग सुभद्रे—अर्जुनानें तुझ्याकरितां हा असला संन्यास घेतला असें जर लोकांना समजलें तर लोक मला मूर्खांत काढतील, नाहीं तुला असें वाटत ?

**सुभ०**—माझ्यापायीं आपणांला कांहीं सुचेनासें होऊन आपण असलें कांहीं तरी—वेडेवांकडें लोक म्हणेनात—असलें कांहीं तरी केलेंत—खऱ्या प्रेमाला बाहेरची बतावणी केव्हांहि साधत नसते—असल्या शेकडों चुका केल्यात—हें सर्व मला भूषणच आहे.

**अर्जु०**—तुला भूषण आहे पण मला दूषणच आहे. तूं माझा स्वीकार केलास म्हणजे हेंहि लांछन नाहींसें होईल. हा माझा डाग धुवून टाकण्याइतकी तूं पवित्र आहेस, तूं माझा स्वीकार केलास कीं क्षणांत मीहि तुझ्यासारखा पवित्र होईन. आपणांसारखें करशील तात्काळ—ह्या दोन दिवसांच्या संन्यासाची आठवणच तुला व मला ह्यापुढें राहतां कामा नये, असें त्याला प्रेमांत पार बुडवून टाक.

पद ३७–( राग मिश्रखमाज; ताल त्रिवट. )

लहरी नटला, डाग डसे हा नटनाचा; धवल मज सजवा ॥ धृ० ॥
प्रेमजलानें विलसन–स्नानें, निज लांछन लपवाया शिकवा ॥ १ ॥

प्रेमांत मला बुडवून टाक—नारदानें मला घाईघाईनें छाटी पांघरायला दिली आणि आतां तो त्याचा डांगोरा चोहोंकडे केल्यावांचून रहाणार नाहीं—

**सुभ०**—होईना डांगोरा—आपण त्याकडे लक्षच देऊं नये. श्रीकृष्णानें नाहीं का रुक्मिणीला द्वारकेंत पळवून आणली—तशी आपण मला—

**अर्जु०**—रुक्मीणीनें पत्र पाठविलें—तूं उपवास केलेस—चांगलें केलेंस—पण पत्राचा पुरावा कृष्णाचे हातीं होता, त्याला कोणी कांहीं बोललें नाहीं—तुझा

उपवास शिल्लक रहातां कामा नये–शिवाय रुक्मिणी सोन्याच्या द्वारकेंत, तेव्हां तीच पळून आली–फूस लावून पळवून आणली नाहीं असें जो तो म्हणतो–आम्ही पांडव कंगाल—

**सुभ०**—आपण धनंजय आहां–धनंजयाच्या वैभवापुढें सोन्याची द्वारका काय पदार्थ आहे ?

**अर्जु०**—मला धर्मराज धनंजय म्हणतात हें खरें–पण उद्यां तूं आणि मी धर्मराजांना नमस्काराला गेलों आणि त्यांनीं मला विचारलें "धनंजया बायकोबरोबर द्वारकेची किती संपत्ति हुंडा म्हणन आणली आहेस" मी काय उत्तर देणार ! तेव्हां तूं असें कर, इतका इतका हुंडा दिल्याशिवाय आमचें लग्न व्यवस्थेशीर होत नाहीं, इतका हुंडा द्या नाहींतर मी मरेपर्यंत उपवास करतें असा हट्ट धरून कृष्णापाशीं बैस–मग कृष्णालाच कबूल करावें लागेल कीं ह्या लग्नांत अर्जुनाकडे कांहीं उल्लूपणा नाहीं–कोणत्या हुंडयाचा हट्ट धरणार सांग पाहूं !

**सुभ०**—हुंडा, मानपान, करणी, सर्व मीं व्यवस्थेशीर ठरवून ठेवलें आहे–लग्नाची यादीच हृत्पटलावर कोरून ठेवली आहे–दोन दिवसांच्या उपवासांत मीं दुसरें काय केलें ? ही यादीच मुक्रर केली–उगीच म्हटलें आयत्या वेळीं घाईघाईनें कांहीं नको–ही यादी धर्मराजांच्या कानीं गेली म्हणजे शाबास धनंजया असेंच आपणाला सर्व लोक म्हणतील–ऐकायची होती हुंडयाची, मानपानाची, करणीची यादी—

**पद ३८–( राग पहाडी; ताल दादरा. )**

खजिना सुवर्ण केतकी प्रेममय हुंडा, प्राणनाथा दिधला देह हा हुंडा ॥ धृ ॥ दासीसम करिन सेवा, मानपान हा ठरवा; करणी सुदर्शनाची यादींत मांडा ॥ १ ॥

एवढें वैभव मिळाल्यावर कोण आपणाला दोष देणार ? आपलें लग्न व्यवस्थेशीर होत आहे हो-घेऊं का ती छाटी काढून ?

**अर्जु०**—तूं कशाला-मीच देतो ही छाटी अशी फेंकून ( अर्जुन छाटी फेंकत असतां नारद, कृष्ण, रेवती, चंद्रप्रभा, दासी, मेघनाथ, भैरवनाथ वगैरे प्रवेश करतात. )

**नार०**—अर्जुना, जमिनीवर ती छाटी अशी घाईघाईनें फेंकून देऊं नकोस-बरी वेळेवर मीं झेलून धरली-वीण्यावर अशी ठेवून वशिष्ठाकडे परत करतों-रेवती वहिनी, सूर्याची ती शाल अर्जुनाच्या मस्तकावरून काढा व नवरदेवाला व नवऱ्या मुलीला आहेर अर्पण करा. ( रेवती तसें करिते. )

**मेघ०**—भोजन आहे—

**भैर०**—चमचमीत आहे—

**कृष्ण०**—मित्रा अर्जुना, दादांच्या आज्ञेप्रमाणें रेवती वहिनींनीं ह्या लग्नाच्या वेळच्या मुंडावळ्या तुम्हां दोघांनाहि बांधल्या आहेत, आणि नारदाचे देखत माझ्या बहिणीचा हा हात तुझ्या हातांत आतां देत आहे. सुभद्रे, तुझ्या ह्या लग्नाचे समयीं तुझी आणखी काय इच्छा आहे ?

**सुभ०**—श्रीकृष्णापाशीं माझें हेंच मागणें आहे—

पद ३९-( राग भूप; ताल त्रिवट. )

निज भक्ता पावन गुरुवर-वचन करो, चरण ठरो शरण ॥ धृ० ॥
भ्रांत मना विषय-धना शांत करो, मुनिजन-संचारी धर्मध ।
विनय-लता सत्यगिरा गुरुवदिता ॥ १ ॥

पडदा ]



# श्री. कृ. प्र. खाडिलकरांचीं नाटकें

## संगीत–माला

**मेनका**—किंमत १२ आणे.

**द्रौपदी**—किंमत १२ आणे.

**स्वयंवर**—किंमत १२ आणे.

**विद्याहरण**—किंमत १२ आणे.

**मानापमान**—किंमत १२ आणे.

**सावित्री**—किंमत १२ आणे

**बायकांचें बंड**—कि. १२ आ.

**त्रिदंडी संन्यास**—

किंमत १२ आणे.

## गद्य–माला

**कीचक वध**—किंमत १२ आणे.

**कांचनगडची मोहना**—

किंमत १२ आणे.

**सवाई माधवराव**—

**यांचा मृत्यु**—किंमत १२ आणे.

**भाऊबंदकी**—किंमत १२ आणे.

**प्रेमध्वज**—किंमत १२ आणे.

**सत्त्वपरीक्षा**—किंमत १२ आणे.

**स्वती–मत्सर**—

किंमत १२ आणे.

सर्व नाटकें सचित्र छापलीं असून 'बायकांचें बंड' नाटकांतील फोटो सुलोचना संगीत मंडळीच्या नटनटींचे, त्याखेरीज बाकीच्या सर्व संगीत नाटकांतील फोटो गंधर्व नाटक मंडळींतील नटांचे आणि गद्य नाटकांतील फोटो महाराष्ट्र नाटक मंडळींतील नटांचे आहेत.

## नवाकाळ ऑफिसमध्यें मिळणारीं पुस्तकें—

**श्री. य. कृ. खाडिलकरकृत कादंबऱ्या :—**

संसार शकट, सदानंद, आजकाल; प्रत्येकीं किं. १॥ रु.

**श्री. के. रा. पुरोहितकृत:**—शून्यजगत्, आकाशपुष्प; प्रत्येकीं किं. २ रु.

**श्री. भा. रा. धुरंधरकृत:**—१० रुपयांचा चेक किं. १॥ रु.

गीता बोध किं. ६ आणे.